# प्रस्तावना.

—:०:—

'**गुरुचरणीं**'-'**राजरंजन**' व '**आशानिराशा**' हीं तिन्हीं नाटकें अनुक्रमानें तीन वर्षांपूर्वी एकाच वेळीं लिहिलीं गेलीं. परंतु त्या वेळच्या अडचणीच्या परिस्थितीमुळें पहिलीं दोन मागें पडून 'आशानिराशाच' गंधर्व नाटकमंडळीच्या रंगभूमीवर आलें. आज माझे मित्र नटवर्य श्रीयुत शंकर नीळकंठ चापेकर, बी. ए., हे आपल्या किर्लोस्कर नाटक मंडळीकडून **राजरंजन** रंगभूमीवर आणीत आहेत. प्रथम जन्माला येणारे कनिष्ठ व मागाहून येणारे ज्येष्ठ हा जुळ्या भावंडांचा नियम या जुळ्या नाटकांच्या बाबतींतही वाचक व प्रेक्षक लावतील, अशी आशा आहे..

शककर्ता विक्रमादित्य किंवा सुलतान हरुन अलरशीद वेषांतर करून प्रजेच्या अडचणी समजून घेत व योग्य मार्गांनीं त्या दूर करीत, अशा दंतकथा आहेत. मेरी कॉरेलीनेंही आपल्या टेंपोरल पॉवर या प्रसिद्ध कादंबरींत अशाच तऱ्हेचा 'राजा' दाखविला आहे. राजरंजन मधील नायकाची कल्पना याविषयीं वरील गोष्टीच कारण झाल्या.

प्रो० रामकृष्णबुवा वझे या संगीतकुबेरांनीं आपल्या अथांग संगीत रत्नभांडारांतून या नाटकांतील पदांच्या चाली दिल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. तसेच श्री० नानासाहेब चापेकर यांनीं चाली देण्यांत व एकंदर चालींची निवड करण्यांत जें सहाय्य केलें, व आपल्या नटवर्गाकडून नाटक अत्यंत मेहनतीनें बसवून उत्तम सजावटीनें रंगभूमीवर आणण्यांत जो उत्साह दाखविला आणि आपल्या नटवर्गाकडून छायाचित्रें दिलीं, त्याबद्दल मी त्यांचे व त्यांच्या नटवर्गाचे आभार मानल्यावाचून कसा राहूं? नाटकाचे छपाईचें काम अगदीं अल्पकाळांत आपलेपणानें करून दिल्याबद्दल माझे उदार मित्र इंदुप्रकाश छापखान्याचे मालक श्री० दामोदर सांवळाराम यंदे यांचा मी अत्यंत ऋणि आहे. तसेंच इंदुप्रकाशप्रेसमधील मंडळीनेंही जीवापाड मेहनत घेऊन अवघ्या तीन दिवसांत अत्यंत सुबकपणानें पुस्तक छापून दिलें, याबद्दल त्यांचे आभार मानल्यावांचून माझ्यानें राहवत नाहीं. हुबळी येथील प्रसिद्ध फोटोग्राफर श्रीयुत बाबुराव महिंदीकर यांनीं या नाटकांतील छायाचित्रें मोठ्या प्रेमानें सुबक काढून दिलीं व

मनोरंजकप्रेसचे व्यवस्थापक श्री० शांतारामजी आजगांवकर बी. ए., यांनीं अगदीं अल्पावधींत ब्लॉकमेकर श्री. सावंत यांच्याकडून उत्तम ब्लॉक्स करवून तीं छापवून दिलीं, त्याबद्दल या सर्वांचा मी आभारी आहें. नाटकाच्या प्रथम प्रयोगाला फक्त चारच दिवस राहिले व छपाईला देण्याला माझ्याजवळ नाटकाची हस्तलिखित प्रत नसल्यामुळें पुस्तक वेळेवर निघणें शक्य नव्हतें, पण अशा अडचणीच्या वेळीं उदार अंतःकरणानें मला हस्तलिखित प्रत देऊन बिनमोल मदत केल्याबद्दल माझ्या कांहीं प्रसिद्ध मित्रांचा मी किती ऋणी आहें हें मला शब्दांनी सांगतां येत नाहीं. माझे मित्र श्री. वि. जि. नाडकर्णी मला प्रत्येक नाटकाच्या छपाईच्या वेळीं प्रेमपूर्वक मदत करतात त्यांचे व प्रो वि. गो. शेट्ये, श्री. वि. गो. गुर्जर ज्योतिषी. श्री. शंकरराव सरकार, श्री. केशवराव बोडस वकील, श्री. केदार गुप्ते या व माझ्या अनेक प्रेमळ मित्रांनीं वेळोवेळीं मला अनेक रीतीने सहाय्य केलें याबद्दल त्यांचा मी आभारीच आहें.

शेवटीं, अडीच वर्षांपूर्वी आसन्नमरण स्थितींतून मला वांचवून महाराष्ट्र नाट्यकलेची सेवा करण्याचा आनंदाचा दिवस दाखविल्याबद्दल अत्यंत लोकप्रिय धन्वंतरी डॉ. दादासाहेब भडकमकर यांचे व परमेश्वराचे आभार मानून ही प्रस्तावना पुरी करतों.

पार्वतीवाडी, माहीम, मुंबई<br>
पौष शु० १० शिवशक २५२<br>
ता० २४।१२।२५

सर्वांचा नम्र,<br>
**यशवंत नारायण टिपणीस.**



डॉ. रामकृष्ण हरि भडकमकर, एम्. ए., एम्. डी.

मनोरंजन प्रेस, मुंबई.

# समर्पण

अडीच वर्षांपूर्वी काळाच्या दाढेतून ओढून काढून, ज्यांनी
मला पुनर्जन्म दिला व महाराष्ट्र नाट्यकलेची सेवा
करण्यास सामर्थ्य देऊन आजन्म
ऋणी केले, त्या

**डॉ० रामकृष्ण हरी** उर्फ **दादासाहेब भडकमकर**, एम्.ए.एम्.डी.
यांस, त्या ऋणाचें निदर्शक म्हणून हें

**‘ राजरंजन ’**

मी आदरयुक्त कृतज्ञतेनें समर्पण करीत आहें.

ऋणाईत,

**यशवंत नारायण टिपणीस.**

मुंबई येथें रिपन थिएटरांत किर्लोस्कर संगीत मंडळीनें गुरुवार ता. २४।१२।२५ रोजी दिवसा राजरंजन नाटकाचा प्रथम प्रयोग केला त्यावेळचा नटवर्ग वगैरे:—

## नटवर्ग.

**राजा (राजीव)** } श्रीयुत माधवराव जोशी

**जयंती**—श्रीयुत चापेकर

**विश्राम**—पिंगळे

**नंदिनी**—रघुनाथराव शिरूर

**बाबासाहेब**—भावे

**दिवाकर**—अप्पा कुळकर्णी

**शेट केशरचंद**—अंतोबा कुळकर्णी

**मिस्टर चूचाँग**—काळे

**सय्यदअली**—भीमराव

**दयाळ (प्रयाग)** } दुवेदी

**मालिनी**—मास्टर नारायण

**पुष्कर**—मास्टर कामत

**रागिणी**—मास्टर शंकरराव जोशी

**दिवाण**—इनामदार

**स्टेजमॅनेजर**—शंकरराव इंदापुरकर

**हार्मोनियम मास्टर**—प्रो. गणपतराव काळसेकर

**तबलजी**—नरहरपंत

**टेलर्स**—रामकृष्णपंत कपडेकर

**आर्टिस्ट पेंटर**—शंकरराव गायकवाड

**फोटोग्राफर**—बाबूराव महिंद्रकर, हुबळी

**मॅनेजर**—भाऊराव साठे व श्रीयुत नरहरपंत कानडे.

श्री.

# राजरंजन.

## अंक पहिला.

---*---

### प्रवेश पहिला.

---:*:---

( **स्थळ**—राजवाड्यांतील मुलाखत महाल. राजा विक्रम कोचावर बसला असून कॅप्टन दयाळ जवळच उभा आहे. रागिणी गात आहे. )

**रागि०:**—

( **पद १**—राग यमन, ताल त्रिवट )

**श्रीनटेश करि रुचिर नाट्यरचना । दावि जनां लीला अविरत ॥ ध्रु० ॥**
**अवतरला जगा ताराया । असुरां संहरुनि रंजवित भारताला ॥ १ ॥**

**राजाः**—वाः खूप मजा आला! खूपच रंग जमला! खरोखर गाणं ही एक अजब चीज परमेश्वरानं पैदा केली आहे! या गाण्याच्या नादब्रह्मांत मनोवृत्ति तल्लिन झाल्या, की त्यांतच गुंगत पडावंसं वाटतं! हा गिन्हेंबाज जीव त्या ताले-बार तानांच्या लाटावर गिरक्या घेत तरंगू लागला, की स्वर्गसुखहि तुच्छ वाटूं लागतं! गा रागिणीबाई! गा गा आणखी एखादी चीज गा.

**रागि०:**—जी सरकार.

( **पद २**—राग हमीर, ताल त्रिवट. )

**विक्रमा राजा । ना साम्यता । त्रैलोक्यीं भेरि वाजे त्या ध्रु० ॥**
**जागृत तो नृप प्रजापालना । सुखदाता दुःखितांना त्या ॥ १ ॥**
**क्षात्रमहारथि वाक्पंडित जो । कविकाव्या स्फूर्तिदाता त्या ॥ २ ॥**

**राजाः**—वाहवा! वाहवारे राजा विक्रमादित्य! खरोखर मिस रागिणी, तुमचं हें गाणं स्फूर्तिदायक आहे! माझ्या स्मृतिपटावरून तें कधींच पुसलं जाणार नाही.

**रागि०:**—महाराजाना हा माझा मोठाच गौरव केला! महाराजांनी मेहेरबान होऊन आम्हांला दर्शन दिलं आणि या गरीब रागिणीच्या चार चिजा ऐकण्याची तसदी घेतली, यांतच आमच्या श्रमाचं चीज झालं. प्राचीन काळच्या विक्रमादित्य महाराजाप्रमाणं द्वारमंडळचे विक्रमराजेही गुणाचे चाहते आहेत, असा साऱ्या हिंदुस्थानांत सरकारांचा लौकिक आहे आमची रागिणी नाटक मंडळी इथं येऊन खेळ सुरू झाले आहेत. सरकार साहेबांनी मर्जीनुरूप खेळ पाहून आश्रय द्यावा असा अर्ज आहे

**राजाः**—ठीक आहे, आमची मर्जी लागेल त्याप्रमाणं खेळांचा हुकूम होत जाईल.

**रागि०:**—सरकारांची कृपा असावी मी रजा घेते.

**राजाः**—ठीक. दयाळ, यांची व्यवस्था करा. ( दयाळ, रागिणी व स्त्रिया जातात ) वाहवारे महाराजा विक्रमादित्य! विक्रमाच्या नांवाचा डंका यावच्चंद्र-दिवाकरौ असाच झडत राहील! आणि माझ्या ?—छे.! आशाच नको परशत्रूंना पादाक्रांत करून दुनयेचा दिग्विजय करणारा तो मूर्तिमंत विक्रम कुठं; आणि गरीब सावजांची शिकार करून ऐषआरामांत आयुष्य कंठणारा हा नामधारी विक्रम कुठं! स्वराष्ट्राच्या उन्नतीसाठीं अहोरात्र धडपडणारा तो ‘कर्तुमकर्तुमअन्यथा कर्तुम’ सम्राट कुणीकडे; आणि राज्यकारभार अधिकाऱ्यांच्या हातीं सोपवून स्वतः कळसूत्री बाहुल्याप्रमाणं नाचणारा हा दुबळा कुणीकडे! छद्म वेषानं प्रजेची दुःखं समजून घेऊन प्रजेला न्याय देण्याकरितां अधिकाऱ्यांना शिक्षा देणारा तो दक्ष प्रजावत्सल महाराजा कुणीकडे, आणि अधिकारी नाखुष होतील म्हणून रयतेच्या गाऱ्हाण्याकडे दुर्लक्ष करून स्वतःच्या इभ्रतीच्या डौलात आनंद मानणारा हा गरीबाचा काळ कुणीकडे! विक्रमा! विक्रमा! आतां यापुढं स्वस्थ बसून तूं आळसात आयुष्य घालवणार? दरबारी अम्मलदारांच्या हातांतलं बाहुलं होऊन बसणार? लाचखाऊ लफंग्यांची कुलंगडी चव्हाट्यावर आणल्यावांचून त्यांना शिक्षा दिल्यावांचून राहणार? छेः छेः—आजच माझ्या खऱ्या राज्यकारभाराला मी सुरुवात करणार! त्या जगज्जेत्या विक्रमाप्रमाणं मीही दिग्विजय करणार!

( पद ३—राग शंकरा ताल त्रिताल. )

**नसा नसा सजल्या दीपमाला। या हृदयीं फुलला प्रकाश खुला ॥ ध्रु० ॥**
**वाहिलि काया माय स्वदेशा। साह्यासी देव जगाला। कां न मला ॥ १ ॥**

( दयाळ येतो ) कां दयाळ! आजचं गाणं तुला कसं काय वाटलं?

**दया०:**—गाणं संपल्यावरच बरं वाटलं ! एकदाचा त्या गाण्याच्या ऑपरेशन मधून बचावलों म्हणून जिवांत जीव आला ! गाणं ऐकतानां आगगाडींत बसल्या-सारखं वाटत होतं ! तो एंजिनचा धड धड धड आवाज–तो खट खट खट ठेका–तो शिट्यांचा सपाटा–असा जीव घाबरा झाला विचारूं नका ! महाराजांनी अलार्म सिग्नलची साखळी ओढून ती गाण्याची गाडी थांबवली म्हणूनच माझा अपमृत्यु टळला !

**राजा:**—काय म्हणावं तुला ? अरसिक का विनोदी ? तूं मिलिटरी सर्जन ! तेव्हां लष्करी क्रूरपणा आणि डॉक्टरी प्रेमळपणा याचं तूं एक मिश्रण आहेस खरा !

**दया०:**—आणि म्हणूनच महाराजांचा ए. डी. सी. व्हायला लायक ठरलों.

**राजा:**—ए. डी. सी. का ? तूं माझा दिलाचा दोस्त आहेस.–बरं दयाळ ! आतां काय काय कामं राहिली ? कुणाकुणाच्या मुलाखती व्हावयाच्या आहेत ?

**दया०:**—( यादी काढून ) ही आजची कामं. त्या म्हैसूरी नायकिणीचा नाच—

**राजा:**—जाऊं दे तो नाच. आमच्या दरबाऱ्यांच्या तांडवापुढं त्याची काय किंमत ! पुढं ?

**दया०**—कोंबड्याची झुंज—

**राजा:**—कोंबडी झुंझवण्याचे दिवस गेले ! सध्यां रयत आणि रहिम या दोन हत्तीच्या साठमारींत चुराडा व्हावयाची वेळ आली आहे आमची !

**दया०:**—नंतर नजराणे—

**राजा:**—नजराण्यावर टाकूं नजर सावकाश ! पुढं ?

**दया०:**—पुढं त्या शिष्टमंडळाची मुलाखत आहे. इथल्या विदेशी मालाच्या व्यापाऱ्यांचं डेप्युटेशन. शेट केशरचंद, मि. दिवाकर, मि. चूचाँग !

**राजा:**—बरोबर ! हेंच काम करूं या प्रथम. बोलवा त्यांना. पण अगोदर तें प्रकरण पाहूं दे बरं जरा. ( दयाळ एक कागदाचें बाड देतो व जातो. राजा कागद चाळीत बसतो. नंतर दिवाकर, केशरचंद, चूचाँग व दयाळ येतात. ) या मि. दिवाकर–या शेट केशरचंद–आणि हे—

**चूचाँ०:**—चूचाँग ! मिस्तर चूचाँग.

**केश०:**—आमच्या नवी भागीदार हैत. चिनी हैत, चांगला शावकार हैत. हांगकांग, शिंगापूर, बम्बई, लण्डण शमद्या ठिकाणा आमच्या कुंपन्यांत हे भागीदार हैत.

**चूचाँ०:**—मी यांची भंगी है–चूंग.

दया०:—( टाळी वाजवून स्वगत ) सांपडली ! डार्विनच्या थिअरीतली मिसिंग लिंक ती हीच ! हा चूचौंग माकड आणि माणुस यांतली मिसिंग लिंक आहे खास ! माकडाच्या कमरेला शेपूट असत; याच्या डोक्यावर आहे.

राजाः—बरं शेट केशरचंद, मि. दिवाकर आणि चूचौंग ! तुमच्या अर्जाचा मी निकालच एकदम सांगतो.

केशर०:—महाराज षरकारनी आमच्या मतलब आधी थोडा शमजून घ्यावा.

राजाः—मतलब काय समजून घ्यायचा आहे ? आज बारा वर्षं आमच्या राज्यांत तुम्ही कापड वगैरे सर्व तऱ्हेच्या विदेशी मालाचा व्यापार करीत आहां. पण हल्ली ' होम इंडस्ट्रीज आणि खादी प्रसार ' या नांवाखाली अराजक लोकांनी चळवळ सुरू केल्या कारणानं तुमचा माल खपेनासा झाला आहे ?

केश०:—होय षरकार.

राजाः—तेव्हां या चळवळीला राजद्रोही ठरवून तुमचा व्यापार पूर्ववत् चालवायला तुम्हांला मदत करावी अशी तुमची मागणी आहे.

केश०:—षरकारनी शमर्द बराबर षमजून घेतलं हे !

चूचौं०:—बिग जरासुंदा संक ना !

राजाः—काय जरा मुद्दां समजलं नाही ?

केश०:—नहीं नहीं ! चूचौंग म्हणते, जरा मुद्धां शंका नै.

दया०:—( स्वगत ) मायभाषे ! तुझे आज पुरे हाल ग आहेत ! हे चिनी-हे मारावडी यांची तुझ्यावर नुसती जबरदस्ती चालली आहे ग !

राजाः—हें पहा, कोणतीही चळवळ अराजक ठरवायची तर तिचा उद्देश कायद्यानं प्रस्थापित केलेली सत्ता उलथून पाडण्याचा असला पाहिजे. होम इंडस्ट्रीज किंवा खादीप्रसार यांचा तसा उद्देश कसा सिद्ध करता येईल ?

दिवा०:—कां नाही सिद्ध करतां येणार ? महाराज, लोकसत्तात्मक राष्ट्रा-प्रमाणं सर्व कारभार प्रजेच्या तंत्रानं चालावा म्हणून क्रांतिकारक चळवळ करणाऱ्या बाबासाहेब देशमुख वगैरे पुढाऱ्यांनीच आपले हेतु पार पाडण्या करितां ही संस्था निर्माण केली आहे. ती वरवर दिसायला जरी निरुपद्रवी असली तरी राजक्रांति घडवून आणण्या करतांच तिचा उपयोग होणार आहे. अर्थात कायद्यानं प्रस्थापित केलेली सत्ता उलथून टाकण्याचाच या चळवळीचा हेतु आहे.

**केश०:**—सिवायं दुषरं अर्ष है, रयतेवर जशा परकारचा राज्य है, तषा व्यापारावर आमची विदेशी मालाच्या ब्यापारांचा राँज्य है. तो आमच्या राज्य डुबाबा, ये बाबत ही खादी आणि हप्तकला चळवळ शुरूं है.

**दया०:**—( स्वगत ) वाः हा खरा राजद्रोह ! हे तर्क शास्त्र खूप अजब आहे !

**केश०:**—आमच्या विदेशी कापडाचा बेपार बंद पडावा, 'आमच्या गिरण्यांना कुलुप बशावा, ये बाबत या चळवळ्यांनी हातरहाट हातमागावरीलच खादी शमद्या लोकांनीं वापरावी अशा ठराव केला है ! आणि लोकांनींही घरोघर चरके शुरू करून राजद्रोह चालविला है !

**राजा०:**—केशरचंद, हें तुमचं व्यापारी राज्य आणि त्यांतला राजद्रोह आम्हांला मुळीच मान्य नाही. आम्हांला आमच्या सत्तेपुरतंच पाहायचं आहे. लोकानी चरके सुरूं केले तर आम्हांला कसली भीती ? चरका म्हणजे कांही तोफ किंवा बंदुक नव्हे, तेव्हां तो राजद्रोही ठरवून जप्त करतां येईल. घरोघर सूत काढून हातमागावर विणलेली खादी जर लोक वापरूं लागले तर त्यांत त्यांनीं राजद्रोह तो काय केला ?

**दिवा०:**—मी सांगतो—

**चूचाँ०:**—ना मीनी संगतुं—

**केश०**—नें चूचाँग तुय दखनी बोली जानते नें.

**चूचाँ०**—ना न्ना, मीं जंतो संमंद जंतो. मीनीच संगतु. खांदींचा संद्रा तोंपी केंद्रीचा ड्रेग हा.

**राजा०**—काय काय !

**केश०:**—परकार ! ए म्हणते, खादीचा शद्रा टोपी हा कैदी लोकाचा डरेस है. परकार रयतेवर कैद्यापारखा ज्युलूम करते. तेवां पारी रयत कैदी–गुलाम है, ये परकारला पमजावं, ये साठी शमद्यानी ये कैदीचा डरेसच करावा अशा या चळवळ्यांचा मतलब है.

**राजा:**—या मतलबांत कांही अर्थ नाही. गुलामगिरीच्या पेशाचं प्रदर्शन खादीच्या विशिष्ट वस्त्रांनीं होत असलं, तरी तशातऱ्हेनं मिरविण्यांत भूषण मानण्याइतके लोक मूर्ख नाहीत. खादी काय किंवा इतर होम इंडस्ट्रीज म्हणजे हस्तकला काय—या चळवळी मुळींच अराजक नाहीत.

**केश०:**—पण ते मुळं आमच्या व्यापारांत केवढा उलथापालथ होतो.

**राजाः**—तुमच्या व्यापाराची उलथापालथ म्हणजे आमच्या राज्याची उलथापालथ नव्हे! ... या तुमच्या व्यापारी घडामोडीत मन घालायचं आम्हांला कारण नाही. आमच्या गरीब रयतेच्या–

**दिवा०ः**—गरीब! रयत गरीब? रयत तर बेफाम मस्त झाली आहे लोक दुकानापुढं उभे राहून विदेशी माल घेऊं नका म्हणून व्याख्यानं देतात! अमलदारांना भीत नाहीत! तुरुंगांत न्या म्हणतात!

**केश०ः**—बायडी लोक भारीभारी बोलते! पुरुषांच्या पुढे पुढे नाचते! कायदा ज्युमानित नै. आमचा हात धरून ओढते! कलीचा प्रभाव!

**चूचाँ०ः**—इंस्त्री लेंक्चर देंते! मी चिन्नी. ती जंती! जंती! ती मन्ना पंकी म्हंते.

**राजाः**—काय म्हणते?

**चूचाँ०ः**—पंकी!

**दया०ः**—हं हं मंकी! जयंतीबाई याना मंकी–माकड म्हणतात

**चूचाँ:०**—नान्ना! पंकी!

**दिवा:०**—यांना परकी म्हणतात—लोक वाटेल तें निद्य प्रकार करतात. मी तर म्हणतो, की यावेळी राजद्रोही म्हणून या चळवळ्यांना वरवंट्याखाली वाटून काढले पाहिजेत.

**राजाः**—दिवाकर, होम इंडस्ट्रीजवाल्यांनी माझ्याकडे संरक्षक कायद्याची मागणी केली होती, पण तुमच्यासारख्या विदेशी व्यापाऱ्यांचं नुकसान होऊं नये म्हणून मी ती मान्य केली नाही. अर्थात त्या लोकांना मी नाराजच केलं, तरी सुद्धां लोकांनी अत्याचार न करता शांततेनं चळवळ चालवली आहे. ती आम्ही दडपून टाकणं म्हणजे जखमेवर जळके निखारे ठेवण्यासारखं नव्हे का?

**केश०ः**—पण आमी षरकारला एवढा कर भरते अन् षरकार आमाला कांहीच मदत देत नै! शमद्या वखारींत जुना कापड तो कुजून चालला है, अन् इकड बम्बई बंदरात तर आमची विदेशी कापडाची बोट येऊन उभी राहिली है.

**राजाः**—तिला हाँगकाँग सिंगापूरला हांकारा!

**चूचाँ०ः**—अन्नी मांजी चिन्नी चांची एक अगिनबोंत तितून निगाली हिन, अन लोंक चा पीन्ना!

**केश०ः**—षरकार, आमचा केवढा नुकसान होता है—

**राजा०**:—तुमचं नुकसान होऊं नये म्हणून मी माझ्या प्रजेचं नुकसान करावं कीं काय ? तुमच्या परदेशी अन्नाचा खप व्हावा म्हणून मी घरोघरच्या चुली बंद कराव्या कीं काय ? तुमच्या विदेशी मेवामिठाईची आणि बिस्किट चॉकोलेटची विक्री व्हावी म्हणून मी देशी हलवायांची दुकानं बंद करावी कीं काय ? तुमच्या कंडेन्स्ड मिल्कचे डबे खपावेत म्हणून राज्यांत कुणी गाई म्हशी राखूं नयेत असा मी कायदा करावा कीं काय ? तुमच्या विदेशी दारूच्या बाटल्या संपाव्यात म्हणून शुद्ध जलाच्या विहरी बुजवून, नळाचं पाणीही मी बंद करावं कीं काय ?

**केश०**:—पण आमी आमच्या शमद्या बेपारांत षरकारची भागी ठेवते—

**राजा**:—( रागानें ) गप्प रहा. मी राजा आहे; मारवाडी व्यापारी नाही. तुमच्या सारखा विदेशी मालावर वारेमाप नफा खाऊन मला गंगाजळी भरायची नाही, आणि शेअरच्या दसपट वार्षिक डिव्हिडंट घशांत टाकण्याकरता मला गिरण्या काढायच्या नाहीत. माझ्या हातांत तुमची व्यापारी तराजू नाही; न्यायाचा कांटा आहे. तुमचा अर्ज मी नामंजूर करतो.

**केश०**:—भाईषाव ! षरकार !

**राजा**:—एक शब्दसुद्धां जास्त बोलूं नका. दयाळ !—

**दिवा०**:—हं ! चला केशरचंद ! चला चूचौंग !

**चूचौं०**:—चिनला ! ( केशरचंद, दिवाकर व चूचौंग जातात. )

**राजा**:—दयाळ, सरकोतवाल सय्यदअल्लींना बोलाव. ( दयाळ जातो. ) चरक्याचं चक्र घरोघर फिरूं लागलेलं पाहून या विदेशी व्यापाऱ्यांची मस्तकं इतकी भ्रमण करूं लागलीं आहेत, कीं खादीच्या चळवळीशीं राजद्रोहाचा बादरायण-संबंध हे बिनदिक्कत जोडीत आहेत. सकृतदर्शनीं क्षुल्लक वाटणाऱ्या या चळवळीनें केवढी क्रांति घडवून आणली पहा ! प्रचंड यांत्रिक शक्तीपुढं मानवी हस्तसामर्थ्याचा काय पाड लागणार अशी आजपर्यंत समजूत होती, पण चरक्याच्या धाग्यानं देशीच काय पण परदेशस्थ राक्षसी गिरण्या जेरबंदी जखडलेल्या पाहून, विदेशी कापडवाल्यांचे डोळे पांढरे झाले आहेत. सधन विदेशी व्यापारी आणि निर्धन देशी कारागीर याचं हें युद्ध अपूर्वच ! या अपूर्वाईच्या झगड्यांत राजा या नात्यानं मला कोणताच पक्ष घेतां येत नसला तरी खासगी व्यक्ति म्हणून या हस्तकलांना मदत करायला मला काय हरकत आहे ?

( पद ४—राग सुवासुगराई ताल त्रिवट )

**या जनार्दनपायीं मन रमता । वरिन लोकीं मान्यता त्याजितां सत्ता ॥**
**॥ ध्रु० ॥ रुधिर शोपूनिया । हरित जीवा जळवा । भासते प्रिय भारता ।**
**तुला रिपु गांजितां ॥ १ ॥**

( दयाळ व सय्यदअल्ली येतात. ) सय्यदअल्ली ! मी तुम्हांला मुद्दाम निरोप पाठविला. तुमच्यासारखे लोकांशी मिळून मिसळून वागणारे पोलिस अधिकारीच आम्हांला खरी माहिती देतील. होम इंडस्ट्रीज आणि खादी प्रसार या गोष्टींना मी सरकारी सहाय्य देत नाहीं, म्हणून लोकांत असंतोष पसरला आहे का ? कचरूं नका, स्पष्ट सांगा.

**सय्य०:**—लोक म्हणतात, की महाराजांनीं आमची रास्त मागणी अमान्य करून, रयतेचा राग निष्कारण ओढवून घेतला आहे. लोकांच्या तोंडचा एक एक उद्गार जर सरकारांनी ऐकला—

**राजाः**—ते माझ्या संबंधानं अगदीं वाईट बोलतात का ?

**सय्यदः**—वाईट ? हंः ! लोक म्हणतात, की महाराज विदेशी व्यापाऱ्यांच्या हातांतलं—

**राजाः**—बाहुलं बनले आहेत ! असंच ना ? अस्सं ! ठीक आहे, मी बाहुलं नाहीं हें त्यांना कबूल करायला लावीन. दयाळ ! सय्यदअल्ली ! या घटकेपासून ज्या ज्या गोष्टी मी करीन, त्या तुम्हां दोघांकडून अगदीं गुप्त राहतील अशी शपथ घ्या.

**दया०:**—
**सय्य०:**— } शपथ—याच पायांची शपथ !

**राजाः**—प्रजेचीं दुःखं समजून घेण्याकरतां वेषांतर करून ' होम इंडस्ट्रीज व खादी प्रसार ' मंडळांत सामील व्हायचं मी ठरवलं आहे. दयाळ, तूं नेवढा माझ्या बरोबर पाहिजेस. खादीचा सद्रा टोपी एवढं वेषांतर आपल्याला पुरेसं आहे. वेषांतरांत माझं नांव राजीव. समजलंना ? रा-जी-व ! आणि तुझं प्रयाग. लक्षांत ठेव नीट–प्रयाग ! सय्यदअल्ली, तुम्ही एवढंच करायचं, वेळ पडेल तसा वेष घेऊन आमच्या नजरेच्या टप्यांत तर राहयचंच, पण दिवाकर, केशरचंद, आणि चूचाँग या सोनेरीटोळीवर टेहळणी ठेवायची. जा तुम्ही कामाला लागा. ( सय्यदअल्ली जातो. ) दयाळ, परमेश्वर कुणाकडून केव्हां कसा धडा देतो

पहा. त्या क्षुल्लक नायकिणीनं विक्रमाच्या चरित्राचं गीत गायलं आणि एका क्षणांत माझ्या चरित्राला निराळं वळण लागलं! ( हुजऱ्या येतो. )

**हुज०:**—सरकार, दिवाणसाहेब आले आहेत.

**राजा:**—येऊंदे त्यांना आंत. ( हुजऱ्या जातो. ) दयाळ, आपल्या या बेताची बातमी दिवाणसाहेबांना मुळींच लागूं द्यायची नाहीं बरं. दिवाणाशी दिलाच्या गोष्टी सांगणारा राजा दिवाणाच समजला पाहिजे. ( दिवाण येतो. ) या दिवाणसाहेब! बसा. शिष्टमंडळाचा अर्ज मी नामंजूर केला. आपल्याला कळलं नसेल—

**दिवा०:**—मला ते कळलं म्हणूनच महाराजांच्या दर्शनाला आलों. महाराज, नेहमींप्रमाणं हे प्रकरण निकालाकरतां माझ्याकडे सोपवलं असतं, तर—

**राजा:**—तर तें सांगायलाच नको. नेहमींप्रमाणंच त्याचा निकाल झाला असता!

**दिवा०:**—महाराजांना मी दिवाणगिरीवर नको असलो तर माझा राजीनामा घ्यावा.

**राजा:**—छेः छेः छेः! राजीनाम्याची काय गरज? आपल्यासारखे स्वामिनिष्ठ आणि कर्तबगार दिवाणच आम्हांला सदैव पाहिजे आहेत. आपली इच्छा असली तरी आम्ही आपल्याला सोडणार नाहीं.—पण दिवाणसाहेब! आपली परंपरागत राज्य-कारभाराची पद्धत या नव्या काळाप्रमाणं बदलायला नको का? सगळ्या जगभर जी स्वातंत्र्याची लाट उसळली आहे, ती आमच्या राज्यावरून गेल्या वांचून कशी राहील? प्रजेंत जागृती झाली आहे ही उत्तम गोष्ट आहे. आणि लोकांना शक्य तितकं स्वातंत्र्य देण्याचा माझा मनोदय आहे. निदान या निरुपद्रवी हस्तकलाना प्रोत्साहन द्यायला काय हरकत आहे? राजकर्त्यांनी लोकांच्या सात्विक आकांक्षांना थोडा तरी मान द्यायला नको का?

**दिवा०:**—अशा तऱ्हेनं राजेच जर लोकांना मान देऊन चढवूं लागले तर त्याबद्दल उपकार न मानतां लोक राजांच्या डोक्यावरच नाचूं लागतील! हल्लीं चहूकडे चळवळ्यांचा नुसता सुळसुळाट झाला आहे. कसल्या चळवळी! तो बावा साहेब देशमुख! त्याची ती मुलगी–काय तिचं नांव?—हो—जयंती! आणि त्यांचे ते बंडखोर अनुयायी, सगळ्यांना—

**राजा:**—पण दिवाणसाहेब, हें व्यापारी प्रकरण आपण सर्वस्वी माझ्यावरच सोंपवाना! बाकीचा सारा कारभार आपण नेहमीं प्रमाणंच पहा. या कामांत मात्र प्रत्येक हुकूम मी प्रत्यक्ष देत जाईन. आपण मुळींच ढवळाढवळ करता कामा नये.

**दिवा०**:—सरकार, संभाळा ! नरमाईनं लोक बेफाम होतील ! दिवसा ढवळ्या अत्याचार करूं लागतील !

**राजा**:—तसं झालं तर त्याचक्षणी हा अधिकार परत आपल्याकडेच देईन ! आणि या प्रकरणांतून मी कायमचं अंग काढून घेईन ! मग तर झालं ना ? मग तुम्ही वाटेल ते उपाय. करून वाटेल तसे लोकांना वठणीला आणा. पण जोपर्यंत लोकांनी ही चळवळ शांततेनं चालवली आहे, तोपर्यंत मला हा प्रयोग म्हणून तरी करून पाहूं द्याना !

**दिवा०**:—हुजरची आज्ञा प्रमाण. तोपर्यंतच असेल तर खुशाल हा प्रयोग आपण करून पहावा. ( आंत ' वंदे मातरम् ' ' जयंती देवी की जय ' )

**राजा**:—जयंती देवीकी जय ? हें काय आहे ? खादीवाल्या स्वयंसेवकाची मिरवणूक वाटतं. चला चला पाहूं तरी या जरा मजा सज्जांतून !

( राजा, दिवाण व दयाळ जातात. )

---

## प्रवेश २ रा.

—:०:—

( **स्थळ**:—दिवाकराचा बंगला—बाग—दिवाकर येतो. )

**दिवा०**:—( स्वगत ) हस्तकला प्रसारक मंडळ अराजक संस्था ठरली असती, की चळवळ्यांचे चाळे बंद पाडून नवीन फक्टरीजचं काम चटकन सुरुं करतां आलं असतं. पण आमच्या दीडशहाण्या राजेसाहेबांच्या अंगांत सैतानाचं वारं आलं, आणि त्यांनी आमचा अर्ज फेटाळून टाकला ! पुनः एखादे वेळी अशीच लहर येऊन आम्हां विदेशी व्यापाऱ्यांच्या वखारीच नाहीना हा बंद करणार ? कांहीं सांगवत नाही ! तसं झालं, की आमची कंपनी बुडणार आणि ती बरोबर आमच्या चौथ्या भागाचीही गच्छंतीच होणार ! मग कसं करावं ? आपलं नुकसान कसं भरून काढावं ?—महाराज द्वारमंडळांतून आपल्या कंपनीचं उच्चाटण करीत होते, पण महाराजांना एक लाखाची मिठाई चारून मी तसं होऊं दिलं नाही, असा खोटांच टेलीफोन मी केशरचंदाला केलाच आहे. हे लाख पाऊण लाख तरी तूर्त पदरांत पाडून घ्यावेत ! अक्कल दौलत मिळवण्याकरितां खर्च करायची असते; दिवाळखोरीचा दिवा पाजळण्याकरतां नाहीं !—पण ही चळवळ बंद पडल्यावांचून

आमचं चालणार कसं? एकच उपाय आहे. एखादा अत्याचार घडवून आणून त्याचा आरोप या चळवळ्यांच्या माथीं मारतां येईल तर ही चळवळ चटकन बंद करणं सरकारलाच भाग पडेल. (नोकर कार्ड आणून देतो) वा: केशरचंद व चूचौंग आलेच अरे, चार खुर्च्या आण आणि त्यांना घेऊन ये. ( नोकर जातो. केशरचंद व चूचौंग येतात ) या शेटसाहेब! या चूचौंग! गुड मार्निंग.

**चूचौं०:**— गुंद मोदलिंग ( स्वत:चा डावा हात उजव्या हातानें हालवतो )

**केश०:**—दिवाकर! तुम्ही बहोत णामी काम केला. खरोखर शांगते आमचा तोंडचा पाणी पळाला होता.

**चूचौं०:**—पंग आतां संका नांग ना?

**दिवा०:**—शंका? इतकी सुद्धां शंका नाहीं. काम वज्रलेप झालं! मी काल महाराजांच्याकडे पुन: गेलो, पाया पडलो, चुकीची माफी मागीतली, तोंडांत मारून घेतली; तरी त्यांचा राग कमी होईना! महाराज म्हणाले! "दिवाकर! बोलूंच नका. मी तुमच्या विदेशी मालाच्या वखारीच बंद करतो." मी म्हणालों "छे; छे: सरकार, हें काय? मी आहेच. शिवाय केशरचंद बडे सावकार आहेत. चूचौंग फार मोठे गृहस्थ आहेत." ते म्हणाले, "मोठे तितके खोटे! केशरचंद बैल आहे, गद्धा आहे. चूचौंग केलट आहे, माकड आहे." मी पुष्कळ समजूत केली, तेव्हां जरा स्वारी थंड झाली! मग एकदम म्हणाले, "लाख रुपये देतां!" मी म्हणालो "खुशाल देतो;" आतांचा वायदा केला आहे. चेक बुक काढा आधी!

**केश०:**—महाराज पैषा खातो! षरकार पैषा कसा खातो?

**दिवा०:**—जसा तुम्ही आम्हीं सावकार खातो तसाच! चला—चेकबुक लौकर काढा पाहूं.

**केश०:**—चेकबुक तो बराबर है का नाय शमजत नाय? चूचौंग—तुमचा काढा.

**दिवा०:**—काढा काढा चूचौंग.

**चूचौं०:**—मांजा चेंकबुंक हिंग. पंग केशरचंग लिगल्यावाचून मी नांग लिगागचा.

**दिवा०:**—नका लिहूं. माझं काय जातं! चेकचा पैसा मला थोडाच खायचा आहे? महाराजानांच चारायचा आहे. माझ्या हिश्शाचं मी पाहून घेतो. केशरचंद! उशीर होतो, तुम्हीं घाण करतां. बघा वखारी बंद होतील! ते खिशांत काय दिसत आहे? चेकबुकच! काढा—काढा लौकर—लिहा चेक!

केश०:—बरं, आम्हीं आमचा आठ आणे भरते. चार आणे दिवाकरशाब तुम्हीं, अन चार आणे चचाँग.

चूचाँ०:—( एक पावली काढून ) हे मांजे च्यार अन्ने रोख.

दिवा०:—वा: चचाँग! खूप केली! हे चार आणे नकोत! लाखाचे चार आणे—पंचवीस हजार रुपये हवे आहेत! तुम्ही चिन्नी चिकु मारवाड्यावर ताण करता!

केशः—मारवाडी चिकु नै, मारवाडी हिशेबी है. हिशेबाबाहेर पै देनारभी नै, अन घेनारभी नै. तुम्हीं दख्खनी शमद्याच्या टाळूवरून हात फिरवतो. हा—रामराम—दिवाकरशेट!

चूचाँ०:—गुंद मोंदलीग. ( स्वतःचा डावा हात उजव्या हातांत धरून हालवतो.)

दिवा०:—बघा—बघा. चिनीलोक गुड मॉर्निंग करतांना नुसता हात हातांत देत नाहीत. मग आम्हांला आपल्या टाळूवरून हात फिरवून, आमच्या हातांत आपली शेंडी थोडीच येऊं देणार आहेत! केशरचंदाना तर तीन शेंड्या! खोट्या हिशेबाच्या जशा तीन वह्याच! एका वहीचा जसा दुसऱ्या वहिशीं—दुसरीचा तिसऱ्या वहिशीं मेळ बसत नाहीं, तसाच एका शेंडीचा दुसरीशी—दुसरीचा तिसरीशी संबंध नाहीं.

केश०:—पन, बिन शेंडीच्या शाहेबाच्या हातांत आमच्या शमद्याच्या शेंड्या असतात.

दिवा०:—साहेब लोक खरे शहाणे! कुणाच्याही हातांत आपली शेंडी जाऊं नये, म्हणून शेंडीच ठेवीत नाहीत. मुसलमान तर आपली शेंडीच काय पण डोकीचा एक केंसही कुणाला उपटतां येऊं नये, म्हणून हजामत करून गुळगुळीत गोटा करतात! पण भोळे बिचारे दाढी राखून फसतात! कारण साहेब लोक शेंडीसारखीच त्यांची दाढी धरून हालवतात.

चूचाँ०:—दिवाकर! तुम्हा शेंदी ना! सायंब होते? अन मांजी लांबी शेंदी पकंदते.

दिवा०:—हो पकडतो—चांगली पकडतो. चेक द्या आधीं केशरचंद.

केश०:—कुणांच नाम लिखूं? महाराजांच?

दिवा०:—त्यांच कशाला? माझं लिहां! बेरर चेक करा हं; क्रॉस करूं नका. चूचाँग! लिहा. मी चहा मागवतों. चपराशी चहा—



चूचाँग—गुंद मोंद लिग ! चिन्नी अंसाच तुंस्ता हंत हालंते. ( पान १३ )

मनोरंजन प्रेस, मुंबई ४.

**केश०:**—( लिहीतांना ) दिवाकर ! माफ करो. हमी कधी चाय नाय घेत. आपुन कधीं शिवलोंभी नाय चायला.

**दिवा०:**—खरा मारवाडी चहाचा सुद्धां खर्च करीत नाहीं. खादीवाले आहा कीं काय ? खादीवाले चळवळे चहा घेत नाहींत ! चूचाँग तुम्ही चहा घेतां ?

**चूचाँ०**—मेन्ना चिनी चहा लांगतो. दुंद साखर नांग लांगतो. उंकळतं पान्नीत चां टांकतो अंग पितो. तुंगचा चहा नां पितो.

**दिवा०:**—बरं नकोतर नको. वाः चेक लिहीले ! झालं–काम झालं ! ( दोघांचे चेक घेऊन ) आतां काम कायम झालंच म्हणून समजा. हो, पण एक सांगायचं राहिलं. ही चळवळ कांही महाराज मोडीत नाहींत. तें तुमचं तुम्ही पाहून घ्या म्हणतात.

**चूचाँ०:**—लांख रुपये खंतो अन्न खांदी चळवळ नांग मोंदतो ?

**केश०:**—चूचॉग ! ते नाही मोडीत तर आपुन का मोडल्यावांचून ठेवते. पोलिस मदत नै देत तर रोहिला पठाण काय थोडा है ? तो सभेला नेऊन मारामारी केली की शमदा चळवळ्या सभेतून पळून जाईल.

**दिवा०:**—बरोबर ! खादीवाले मार खातात–उलटून मारीत नाहीत. ( चपराशी कार्ड आणून देतो तें पाहून ) येऊंदे इकडेच. बरं झालं विश्र म आला.

**चूचाँ०:**—विश्राम कुन्न !

**दिवा०:**—तुम्हांला माहीत नाही ? त्या बड्या चळवळ्या बाबासाहेब देशमुखांचा थोरला मुलगा ! मुंबईत जॉली फॉदर्स कंपनीचा मॅनेजर आहे. (विश्राम येतो.)

**विश्रा०:**—गुड मॉर्निंग–दिवाकरशेट !

**दिवा०:**—गुड मॉर्निंग–विश्राम ! हे शेट केशरचंद आणि चूचॉग.

**विश्रा०:**—हंः हंः हंः ! यांच्याच नव्या फॅक्टरीज व्हायच्या आहेत नाहीं ? गुडमॉर्निंग शेटसाहेब ! गुड मॉर्निंग चूचाँग !

**चूचाँ०:**—गुंद मोंटलिंग ! चिन्नी असाच नुसतां हंत हालंते.

**दिवा०:**—त्यांच्यात तशीच रीत आहे. विश्राम ! आम्ही आतां स याच्या चळवळीबद्दलच बोलत होतो ! प्रश्न निघाला, खादीची चळवळ कशी मोडावी. केशरचंद म्हणाले, रोहिले पठाण ठेवून लोकांना मारून काढावं.

**विश्रामः**—छे, हें अगदीच गैर ! ही मारून मऊ आणण्याची कल्पना अगदीं अडाणीपणाची आहे. आजचा काळ कोणता, प्रश्न काय, कोणत्या लोकांशीं

प्रसंग आहे, याचा दूरवर विचार करूनच उपायाची योजना केली पाहिजे. या गोष्टी इतक्या विकोपालाच गेल्या नसत्या. पण दिवाकर! आपल्या व्यापाऱ्यांचं पहिल्यापासूनच धोरण चुकलं. विदेशी कापडावर "देशी हातरहाट हातमागावरील" असे छाप ठोकून तुम्ही लोकांना फसविण्याचे उपाय केलेत. आणि पोलिसांनी तुम्हांला मदत देत नाहीं म्हणून सांगितलं, तेव्हां तुम्हीं बनावट पोलिस करून धामधूम सुरु केलीत. तिथंच मुळं चुकलं.

केश०:—मग काय बाबाशाब–दादाशाब करून त्यांच्या पाया पडायचं होतं?

विश्रा०:—पाया पडायला हवं होतं असं मी म्हणत नाहीं. पण लोकांची नीट समजूत घालून ही गोष्ट करायला पाहिजे होती. ज्या गोष्टी करून चळवळ्यांच्या पुढाऱ्यांनी लोकमत आपल्या बाजूला ओढून घेतलं, त्याच गोष्टी आम्ही त्यांच्या अगोदर करायला पाहिजे होत्या. फॅक्टरीजपासून लोकांचं केवढं कल्याण आहे, धंदा मजुरी मिळून लोकांच्या जवळ चार पैसे कसे खेळतात, व्यापार उदीम वाढून देशाची कशी भरभराट होते, या गोष्टी लोकांच्या मनांत चांगल्या बिंबवून दिल्या असत्या, की लोक तेव्हांच थंड झाले असते. त्यांना गिरणीचं किंवा विदेशी कापड चांगलं स्वस्त मिळतच होतं, त्यांना हरकत घेण्याचं कारणच नव्हतं.

दिवा०:—विश्राम! आतां खरं बोलायचं म्हणजे लोकांचं कांहीच नाहीं; पण तुमचे वडील बाबासाहेब आणि जयंती सगळ्या लोकांना चिथवतात! स्वतः खादी पेरतात! खादी टोपी घालतात! रहाट फिरवतात!

केश०:—आतां चळवळ अशी मोडायची नाहीं तर कशी मोडायची?

विश्रा०:—कशी मोडायची तें पहायचं आहे? मी ही चळवळ मोडून दाखवितो. सरकारी मदत नको, पोलिस नकोत, रोहिले पठाण नकोत, तुम्हीं किंवा हे केशरचंद चूचाँगही नकोत! आमच्या जॉली फॉदर्स कंपनीकडून मला मागून घ्या. माझी या कामावर नेमणूक करा. चार महिन्यांत चळवळ बंद पाडून दाखवतों.

दिवा:—तुमच्या बापाशीं गांठ आहे, विचार केलांत?

विश्रा०:—यांत काय विचार करायचा? ते माझे वडील असले तरी प्रतिस्पर्धी म्हणून त्यांच्याशीं दोन हात करायला मी कचरेन? बाबांशी वादविवाद करून त्यांची समजूत पटवीन. लोकांना जमवून व्याख्यानं देईन. बुकलेट्स् वाटवीन. ज्या ज्या मार्गांनी लोक वळतील असं मला वाटेल ते सारे मार्ग योजून पाहीन.

**केश०**:—आमचा मतलब् अषा. लोकांना आमी माल षप्ता देते. त्यांनी आमचाच माल खरेदी करावा.

**विश्रा०**:—तें बरोबर आहे. तुम्ही कांही त्यांचे पैसे फुकट घेत नाहीं; चांगला माल देता. लोक मूर्खच! पण मूर्खांची समजूत करून त्यांना शहाणपण शिकवावं लागतं.

**दिवा०**:—तुम्ही ही चळवळ मोडता? आम्ही तुमची नेमणूक करतो. कबूल?

**विश्रा०**:—कबूल–कबूल! चार महिन्यांत चळवळ मोडली नाहीं तर नोकरीचा राजीनामाच देईन. पण एकच–रोहिले पठाण घालून मध्यंतरी घोटाळा करूं नये कुणी!

**दिवा०**:—कुणी करणार नाहीं, माझी खात्री घ्या तुमचा पगार आणि या कामाला लागतील ते पैसे आम्ही देऊं. मी तुमच्या कंपनीला आतांच पत्र लिहितो.

**केश०**—रावषाब, हा खादीचा बंड मोडला तर आमच्या कंपनीकडून तुमाला पांच हजार रुपै बक्षिस देऊं.

**चूचाँ०**:—खांदी बंद मोंदून तांकां, मीनी पांच रुपे देतो.

**विश्रा०**:—शेटसाहेब, चूचाँग! मला बक्षीस नको आहे. त मला लांच लुचपतीसारखंच निंद्य वाटतं. त्यांत ही तर सार्वजनिक हिताची बाब! या कामी पैला स्पर्श करणं म्हणजे निव्वळ अधमपणा!

**दिवा०**:—अगदी नीचपणा! लांच कधी कुणी खाऊं नये. पैसा खाणं म्हणजे केवळ निमकहरामपणाचं काम! मी एवढा झालो, लोकांची एवढी कामं केलीं, पण कुणाच्या पैशाला शिवलो नाहीं शिव शिव शिव! अगदी माझ्या कच्चाबच्च्यांची शपथ! विश्राम, तुमची मुलगी कुठं आहे हो? बाबासाहेबाकडेच असते वाटतं?

**विश्रा०**:—कुटुंब वारल्यापासून दोन वर्षं ती तिथंच आहे. काय करावं? कामाच्या गर्दीमुळं आज दोन वर्षांत घरींसुद्धां जायला सांपडलं नाहीं.

**दिवा०**:—तुमचं कुटुंब दोन वर्षांपूर्वी वारलं पण कालच वारल्यासारखं वाटतं! केशरचंद, साहेबांचं कुटुंब काय होतं.!

**केश०**:—आमी तो पायला नाय. पन आमालाबी रडू येतो. लहान मुलं—

**चूचाँ०**:—रंडू तिंपुं तिंपुं निगतो! वाईंत वांततो!

**दिवा०**:—विश्राम! माझं ऐक, दुसरं लग्न करा आतां.

**विश्रा०**:—पुनः लग्न करायचं नाहीं असा माझा कृतसंकल्प आहे. इथून तिथं तिथून इथं, जें नाचतं तें प्रेमच नव्हे. बरं दिवाकरशेट! मी येतो आतां.

**दिवा०:**—या गुडबाय ! ( विश्राम जातो ) केशरचंद ! आपलं काम आतां खास होणार ! विश्राम बडा हुशार आहे.

**चूचौँ०:**—मीनी आंतां जांतो.

**केश०:**—हमी भी जाते ! दिवाकर, महाराजांना भरणा कवा करणार ?

**दिवा०:**—हां आतां निघालोंच तिकडे. या शेटसाहेब, या चूचौंग. ( केशरचंद व चूचौंग जातात ) अरे, खुर्च्या ने. ( नोकर खुर्च्या नेतो ) एक एक गोष्ट होते ती माझ्या पथ्यावरच पडते ! महाराजांनीं नुसता आमचा अर्ज नामंजूर केला; पण मला पाऊण लाख रुपये मिळाले ! केशरचंदाला वाटतंय, कीं मी लाख रुपये महाराजांना चारतो आहे.!—कुठले महाराज ? मीच महाराज ! आणि हें माझं पोट माझं राज्य !

---

## प्रवेश २ रा.

——:०:——

[ **स्थळः**—बाबासाहेबांच्या घरांतील एक दिवाणखाना—पुष्कर व मालिनी चरक्यावर सूत काढून गाणं गात आहेत. ]

**पुष्क०:**— }
**मालि०:**— } ( पद ५—दोहरा. )

**चरका गुइं गुइं गुइं बोले । तुम् सुनोजी कातनवाले ॥ ध्रु० ॥ एक पैसेका रू मंगाई । रुक्का देकर पिंजवाई । जिसके घरमें नहि एक चरका । उनूपर पडे तवाई ॥ १ ॥ चरका तेरा रंग बेरंग । पानी मो गुल्जार । क्या कहूंजी कातनहारे । तुइं तुइं निकली तार ॥ २ ॥ कहत कबीर सुनो भाई साधु । ए पद है निर्वान । इस् पदकी निंदा करे सो । नरके जावे जान् ॥ ३ ॥**

( पदाच्या शेवटीं घड्याळांत नवाचे टोके पडतात. )

**पुष्क०:**—माले तुझा चरका असा काय चालतो ? हें कां सूत काढणं ? हें बघ. असं काढावं भराभर भराभर! ( सूत काढून दाखवितो.

**मालि०:**—आम्हांला येतयं काढताहो, काकासाहेब ! हें बघा ! ( चरका फिरवूं लागते, तों सूत तुटतें. )

**पुष्क०:**—तुटलं ! तुटलं ! ( टाळ्या वाजवून ओरडतो. जयश्री येते.



जयंती—पण किनई असं गुंडाळावं. ( पान १७ )

मनोरंजन प्रेस, मुंबई ४.

**जयं०:**—पुष्कर ! काय गडबड आहे ? कायरे तुटलं–तुटलं ! या कोण, या चरक्यावर ? मालुबाई ? अगबाई ! तुम्ही सूत काढता कीं काय ? सूत निघतंय का उगीच चरका फिरवितां ?

**पुष्क०:**—( हंसून ) जवळ जवळ तसंच ग ताई ! जरा कुठं सूत निघायला लागलं की, पटकन तुटतं.

**मालि०:**—मुळींच तुटत नाही ! हे आमचे काकोबा 'तुटलं तुटलं' ओरडले तेव्हां तुटलं.

**पुष्क०:**—असं असं ! म्हणजे यांना काढतां येतं, पण—

**मालि०:**—येतं म्हणजे—येतंच ! हें बघ—( चरका फिरवते. )

**जयं०:**—शाबास ! पुष्कर ! बघ, तुझ्यापेक्षां कसं ऐटींत काढते. शाबास ! शाबास ! हे बघ माले, तुला गुंडाळतां येतं–पण किनई असं गुंडाळावं.

( सूत काढून गुंडाळून दाखवते. इतक्यांत **नंदिनी** येते. )

**नंदि०:**—हें काय ? जयंती ! तूं सुद्धां रहाट फिरवितेस वाटतं ? अलीकडे डॉक्टर म्हणूं नका, वकील म्हणूं नका, बॅरिष्टर म्हणूं नका, जो उठतो तो रहाट फिरवीत बसतो. हें काय वेड तुमच्या डोक्यांत भरलं आहे कुणाला ठाऊक ! हजारों रुपये कमवायचा काळ जर दोन तीन आण्यांच्या पैदास्तीकरतां खर्च होऊं लागला, तर अगोदरच दारिद्र्याच्या फेऱ्यांत सांपडलेला देश श्रीमंत होईल का जास्तच दरिद्री होईल ?

**जयं०:**—अगदी श्रीमंत होईल !—निदान चांगला सुखी होईल. आमचंच पहा—आमची राहाणी तुला माहीत होतीना ? विदेशी उंची कापडाशिवाय आमचं पान हालत नव्हतं ! पातळं, लुगडी, शालू, नेकटाय, कालर्स बूटस यांच्याकरितां वर्षास निदान आमचा अडीच तीन हजार रुपयांचा चुराडा होई ! पण ही खादी वापरायला लागल्यापासून शेंसवाशें रुपयांत आमचे सगळे कपडे होतात. कापूस आणून जर आम्ही घरी सूत काढलं आणि हातमागांवर घरींच कापड विणून कपडे घरींच शिवले, तर मला वाटतं, अडीच रुपये सुद्धां लागणार नाहींत ! अग, हा चरका तूं कमी समजूं नकोस बरं ! गांजलेल्या मायभूमीची हांक क्षीरसागरांत निद्रा घेत असलेल्या शेषशाई नारायणाच्या कांनीं गेली आणि हें सुदर्शनचक्र चरक्याच्या स्वरुपांत त्यानं पाठवून दिलं.

पद ६—( राग यमन ताल त्रिवट )

**आशा किरण हा । तिमिर ना दीनां ॥ वरदानि सुरधेनु । यावी जाशि गृह्णा ॥ धृ० ॥ चरका सदारंग । दावीत दिलरंग ॥ फिरफिरे तार । जगताधार ॥ १ ॥**

**नंदि०**:—कांही तरी भरमसाट बडबडतेस झालं ! समजदार माणसानं व्यवहार्य असेल तेंच बोलावं !

**जयं०**:—प्रथम अव्यवहार्य वाटणाऱ्या गोष्टीच कालांतरानं व्यवहार्य ठरतात! शहाणपणाचा गङ्डा मानलेल्या लोकांना जर एवढी अक्कल असती, तर जीजस क्राइस्टचा अमानुषपणानं वध झाला नसता ! तुकारामासारख्या साधूचा छळच झाला नसता. महात्म्यांचे गूढ संदेश तुम्हां आम्हाला उकलता आले तर—

**नंदि०**:—बरं बाई, तुमचे हे रहाटन् माग साऱ्या जगांतल्या गिरण्या बंद पाडतील !—आतां झालं ना ?

**जयं**:—सगळ्या जगाशी आम्हांला काय करायचं आहे ? आमच्या देशापुरतं आम्हांला पाहायचं ! ज्यानं त्यानं आपल्या पुरतं पाहावं !

**नंदि०**:—मी आतां थोडं आपल्यापुरतंच पहाते. हें बघ, सकाळी मोटारींतून उतरल्यापासून मला चहा नाही.—मला जरा चहा दे.

**जयं०**:—चहा मिळायचा नाही. आमच्या इथं मुळी चहाच नाही.

**नंदि०**:—मग दुसऱ्यां कुठून थोडा आणून दे. नाहीतर दुकानांतून तरी आणीव.

**जयं०**:—इथल्या दुकानांत चहा इल्ला ! इथले दुकानदार कांही तुमच्या पुण्यामुंबईचे दुकानदार नव्हत. सभा करायच्या–शपथा वाहायच्या–आणि एका आठवड्यांत पुनः चहा विकायला सुरवात करायची !

**नंदि०**:—चहावांचून आपलं कांहीं चालायचं नाहीं; मी आपली उद्या चालती होतें इथून.

**जयं०**—पण तुला जाऊं कोण देतं ? बी. ए. व्हायचं होतं, ती झालीस. आतां दोन महिने इथंच राहिलं पाहिजे. तुझा तीन दिवसांत चहा सुटतोय बघ. माझा नाहींका सुटला ? थोडा त्रास होतो, मला कबूल आहे. थोड दूधबीद ऊन ऊन प्यायलीस तर—

**नंदि०**:—दूध नको मेलं ! अग, चहा नाहीं तर नाही, ऊन पाण्यांत सुंठ आणि गवतीचहा टाकून तें तरी थोडं दे.

जयं०:—दुधाची तहान ताकावर भागवायची तशी चहाची तल्लफ गवती चहावर गुजरायची! वाः! बरं तूं स्नान करून घे. मी चहा तयार करतें. पुष्कर!

नंदि०:—हा पुष्कर का? तुझा भाऊ? मी म्हटलं कोण पोर आहे कुणाला ठाऊक! हा सुद्धां खादी! आणि ही कोण ग?

जयं०:—ही आमच्या विश्राम दादाची मुलगी. वहिनी गेल्यापासून इथंच असते. मालिनी नांव आहे, पण सगळे ' माले माले ' म्हणतात. आमच्या मालुताई किती गुणाच्या आहेत.

मालि०:–ताईग—

नंदि०:—ही तुला ताईच म्हणते वाटतं? हे बघा मालुताई! तुम्हीं यांना ताई नाहीं म्हणायचं! अत्याबाई म्हणायचं.

जयं०:—नाहींग माले.

नंदि०:—नाही काय! म्हण ग अत्त्याबाई–अत्त्याबाई—हं म्हण.

जयं०:—हं माले ( डोळे वटारते )

नंदि०:—कांही भिऊं नकोस. म्हण अत्त्याबाई—

जयं०:—( दरडावून ) माले! बघ मला अत्त्याबाई म्हणशील तर! खबरदार!

नंदि०:—अत्याबाई नाहीं म्हणायचं मग काय तिनें तुला काका म्हणायचं?

मालि०:—अत्याबाईला मिशा असत्या तर काका म्हटलं असतं!

पुष्क०:—मग मला काग काका म्हणतेस? मला कुठ मिशा आहेत?

मालि०:—तुला आजपासून आत्याबाई म्हणेन हं.

नंदि०:—तसंच कर. आणि जयंती ताईलाही आत्याबाई म्हण हं. माझं ऐकलं पाहिजे बरं.

जयं०:—ऐकेल! बरी ऐकेल! तिची आईच पडलीस.कीं नाहीं जशी कांहीं! पण तूं स्नानाला चल. मालुताई! तुम्हीं किनई माझं तें पातळ आहेना तें नंदिनी ताई करितां काढून ठेवा. जाहं पुष्कर! जा तिला काढून दे तें खादीचं पातळ. ( पुष्कर व मालिनी जातात. )

नंदि०:—इश्श खादीचं पातळ! मला नको मेलं तें! आहेत माझी महेश्वरी जरीचीं पातळं! देवानं स्त्रीच्या जन्माला घातलं, लावण्याचं लेणं दिलं, नाजुक पणाची साठवण केली, आवडी निवडीची जाणीव ठेविली, ती हीं रकटी नेसण्या

करिता कां ? हिरकणीला जसं कोंदण पाहिजे, तसं सौंदर्यालाही सुंदर वस्त्रांचं मखर नको का ? स्त्रीचं सौंदर्य खादीनें खुलेल कां ?

**जयं०:**—सौंदर्याला काय, तें कशानेही खुलतें ! अग खादीच काय, पण वल्कलं नेसलेली शकुंतलाच दुष्यंताला जास्त शोभिवंत वाटली ! आणि म्हणूनच त्याचे उद्गार निघाले. "जातींच्या सुंदरांना कांहीही चालते."

**नंदि०:**—वल्कल नेसलेल्या बायका आवडायचा हा काळ नाहीं. हल्लींच्या काळी तुझ्यासारख्या खादी नेसलेल्या शकुंतलेला मोहून जाणारा एखादा दुष्यंत राजा तर सांपडणार नाहीच, पण राजद्रोहाच्या कलमाखाली गुन्हेगार ठरलेला एखादा चळवळ्या मात्र मिळेल ! अशा दुष्यंताशी लग्न लावण्याकरितां लतामंडपी जायला नको. तुरुंगांतच—

**जयं०:**—नंदिनी ! तुरुंगतीर्थाला निघालेल्या वराच्या गळ्यांत लग्नमाळा घालण्याऱ्या बाणेदार कुमारिका, जेव्हां चहुंकडे चमकतील, तेव्हांच आम्हांला सोन्याचे दिवस दिसतील ! मी तर म्हणतें, की लग्न लावावें तर तें तरवारीच्या धारेवर—सुळाच्या टोंकावर—कडेलोटाच्या काठावर—तोफेच्या तोंडाशीं—

( **पद ७**—राग सारंग ताल )

**मान्य नरवर ज्या मुख कदान्न । देश प्राण देश ध्यान । चढे चढण जरी मरण ॥ ध्रु० ॥ गरुड गगनिं नच पडे झडे । परि उडे पुढें ॥ दर्या धांवुनि त्यां दावित धाका । तुफान् देत धक्का ॥ १ ॥**

**नंदि०**— तथास्तु ! ते कोण ? खादीची सद्रा टोपी घातलेली ते कोण ? तुझे बाबाच वाटतं ? बरोबर कुणाला घेऊन येत आहेत ! तुला पाहायला तर कुणी आलं नाहींना ? ( हंसते )

**जयं०:**— इश्श ! तुला आतां लग्नाचे डोहाळेच पडायचे ? कारण आतां तेवढंच राहिलं आहे तुझं ? अग, आमच्या राज्यांत ही चळवळ सुरु झाल्यापासून नेहमी कुणीना कुणीं मोठी माणसं आमच्याकडे येत असतात.

**नंदि०:**—हे खादीचं बंड निघाल्यापासून मोठा मनुष्य म्हणून ओळखायला कांहीं साधनच राहिलं नाहीं. धनी आणि चाकर सगळेच सारखे ! मोटार मधला शेट आणि मोटार हाकणारा शॉफर दोघांचा पोषाख एकच !

**जयं:०**—नंदिनी, मोठेपणा मनानं ओळखायचा असतो. पोषाखावरुन पारखायचा नसतो. ती मंडळी इकडंच आली. चल तुला स्नान करायचं आहेना ?

**नंदि०:**—चल लौकर ( जयंती व नंदिनी जातात बाबासाहेब, राजा (राजीव) दयाळ ( प्रयाग ) येतात.)

**बाबा०:**—यां बसा. राजीव! पूर्वी या दिवाणखान्यांतील खुर्च्या, कोचं, सगळं फर्निचर विदेशी मखमलीचं होत. पण ती मखमल फाडून टाकून आता त्यांना खादी लावून टाकली आहे. मी स्वतः पूर्वी अपटुडेट युरोपियन थाटानं रहात असे! हॅटसुद्धां घालीत असे. प्रयाग हसूं नका,-टेबलावर जेवीत असे. मुलबाळं चाकर माणसं यांच्या जवळसुद्धां इंग्रजी शिवाय बात करीत नसे. पण एका झटक्या सरशीं सारं बदललं. ही " होमइंडस्ट्रीजची आणि खादीची " चळवळ सुरू झाली; तेव्हां आमच्या दृष्टिवरची भुरळ नाहीशी झाली.

**राजा:**—बाबासाहेब! खरोखर हें मंडळ आणि ही चळवळ म्हणजे आपण एक अपूर्व काम केलं आहे! आपल्यासारख्या स्वार्थत्यागी आणि कर्तबगार पुढाऱ्यावांचून राष्ट्रांच पाऊल पुढं पडत नाहीं हेच खरं?

**बाबा:०**—खरं सांगूं? आम्ही पुढारींच नाही. पण पुढाऱ्यावर निष्ठा ठेऊन तो सांगेल त्या मार्गानें बेधडक जाणारे चिकाटीचे अनुयायी आहोंत.

( उपहाराकरितां फळफळावळ घेऊन जयंती व पुष्कर यतात. )

—राजीव! ही माझी मुलगी जयंती. पुण्यांस फर्ग्युसन कॉलेजांत बी. ए. च्या क्लासांत होती. दोन वर्षं झालीं, ही चळवळ सुरू होतांच कॉलेज सोडून घरीं आली. जयंती, हे राजीव आणि हे प्रयाग दोघेही आपल्या हस्तकला प्रसारक मंडळाचे सभासद झाले आहेत. मंडळाच्या कचेरींतून परस्पर जात होते. पण म्हटलं घर पाहून मग जा. हा माझा धाकटा मुलगा पुष्कर. आणि ते कोण दाराच्याआड आहेरे? माले, चल इकडे ये.

**जयं०:**—ती लाजते.

**बाबा०:**—लाजते कशाला! पुष्कर, आण तिला पुढं. ( पुष्कर मालीनीस ओढीत आणतो. ) ही माझी नात. माझा थोरला मुलगा विश्राम जाली फॉदर्स कंपनीत मॅनेजर आहे—त्याची मुलगी! माले ये. आमचा विश्राम चांगला एल. एल. बी. आहे. पण वकीलीपेक्षां व्यापाराकडे त्याचा ओढा असल्यामुळे त्यानं एका विदेशी कंपनीत नोकरी धरली आहे.

**जयं०:**—मी कॉलेज सोडून घरी आले, तसा जर दादा त्या विदेशी फर्मची नोकरी सोडून या चळवळीचा पुढाकार घेता, तर बाबावरचा कामाचा भार बराच

कमी झाला असता! पण करायचं काय!–बाराशें रुपये पगार आणि मॅनेजरचा अधिकार, दोहोंचाही मोह दादाला सुटणार कसा?

**राजाः**—खरोखर अशा वेळीं मातृभूमीचा अभिमान त्यांच्या अंतःकरणांत जागृत व्हायला पाहिजे होता. मींच परदेशांतून धांवत आलो ना? आपली जन्म भूमी–आपल्या देशबांधवांच्या मर्जीविरुद्ध–विदेशी भांडवलवाले धुवून नेत आहेत, आणि या गोष्टीच्या प्रतिकारार्थ आपल्या बांधवांनी चळवळीला जोरानं प्रारंभ करून त्यांत आपली आहुती द्यायची तयारी केली आहे, असं ऐकतांच केव्हां एकदां इथं येऊन दाखल होतों आणि त्यांच्या खांद्याशी खांदा भिडवून काम करतों, असं मला होऊन गेलं! बाबासाहेब, मी अजून अविवाहित आहे. पण अशा स्थितींत देशकार्यांत आयुष्य घालवायचा माझा निश्चय आहे. एखाद्या राजासारखं माझं ऐश्वर्य आहे, पण त्यांत मला सुख वाटत नाहीं. उंची उंची कापडाचीं वस्त्रं मी वापरलीं आहेत; पण हा खादीचा सद्रा आणि टोपी घालण्यांत मला जो आनंद वाटतो आहे तो त्यांत नाही. गर्भश्रीमंत सवंगड्याबरोबर पंचपक्वानांच्या मेजवान्या मी झोडलेल्या आहेत; पण आपल्या देशबांधवांच्या बरोबर चटणीं भाकर खाण्यांत किंवा उपाशी राहण्यांत मला जें भूषण आहे तें त्यांत नाही. सोन्यारुप्यांनीं मढविलेल्या छपरी पलंगावर, परांच्या गादीवर लोळण्याची मला संवय आहे; पण देशी उद्योगधंद्याची वाढ होण्याकरितां दगडधोंड्यांत चिखलांत किंवा फूटपाथवर पडून राहाण्यांत मला जें सुख आहे, तें त्यांत नाहीं. या चळवळींच्या कार्याकरितां माझ्या भाग्याला तुरुंगवास किंवा फास येऊन माझ्या सर्वस्वाचा नाश झाला तरी हरकत नाही.

**जयं०:**—अहाहा! अशा बाण्याचा एक पुरुष आमच्या बरोबर जर काम करायला मिळेल—

**राजाः**—जर मिळेल का? मिळाला म्हणा! जयंतीदेवी! तुमच्या बरोबर पडेल तें काम करायला मी तयार आहे!

**बाबा०:**—आम्हांला अशाच माणसांची जरुरी आहे. या चळवळीला वर्तमानपत्रं, व्याख्यानं, कीर्तनं! नाटकं इतकी तोंड पाडली पाहिजेत, कीं आमचे घोरत पडलेले राजेसाहेब खडबडून जागे झाले पाहिजेत!

**जयं०:**—राजेसाहेब जागे होणार! त्यांच्या सिंहासनाखालीं सुरुंग लागून ते अस्मानांत उडून गेले तरी जागे होणार नाहींत! देशी उद्योगधंद्यांचं संरक्षण

करण्याकरितां कायदा असावा, अशी आम्ही थोडीका खटपट केली; पण त्यांनीं आमची काय दाद घेतली? दीन दुबळ्यांच्या दुःखाकडे डोळेझाक करणारा राजा राक्षसच असला पाहिजे.

राजाः—या राजाचा मला असा राग येतो—

दया०:—माझाहि त्याच्यावर डोळा आहे! तो कुठं जातो–काय करतो–त्याच्या साऱ्या हालचालींवर माझी नजर आहे!

राजाः—त्याचं नुसत स्मरण झालं की माझा संताप अनावर होतो! माझ्या संतापाचं कारण माझ्याी मुद्रेंत जागतीज्योत भरून राहिलं आहे. जयंतीबाई, माझा चेहरा पाहा–नीट पाहा—अगदी बारकाईने पहा—राजेसाहेबांच्या चेहऱ्यांत आणि यांत कांहीं साम्य आहे का?

जयं०—मी त्यांना तितकं जवळून पाहिलं नाही; पण साम्यं मात्र दिसतं खरं! –पुष्कळच दिसतं!

राजाः—दिसतं ना? बाबासाहेब! आपण पाहा! जुळा भाऊ वाटतो की नाही?

बाबा०:—खरोखर वाटतां! महाराजांचं तुमचं नातंबितं तर नाहीं?

राजाः—नातं? कोणत्याही राजाशीं नातं जोडायची माझी इच्छा नाहीं!

बाबा०:—मग भयंकर साम्य आहे! महाराजासारखा पोषाख घातलांत तर कुणीही आपल्याला महाराज म्हणून फसेल देखील!

राजाः—महाराजांचा एखादा वैरी, राजा समजून माझा खून सुद्धा करील, इतकं साम्य आहे! पण चेहऱ्यांत साम्य असलं तरी स्वभाव मात्र एकमेकांच्या अगदी उलट आहेत. त्यांच्या सारखाच मी एक मूर्ख चिंतामणी आहे अशी नाहींना तुमची कल्पना?

जयं०:—छेः असं आम्हांलां कसं वाटेल?

राजाः—बरं आज ओळख झाली आहे. परिचय वाढत जाणारच आहे येतों आतां.

बाबा०:—पण आपण अजून फळांना हात नाहीं लावला! थोडीं खा; मग जा.

दया०:—श्रमविभागाचं तत्व मला पसंत आहे! बोलायचं काम तुम्हीं करा; मी खायाचं करतोंच आहें.

राजाः—बाबासाहेब, आमचा प्रयाग कसा भिडस्त आहे पाहिलात ना? बाकी एक आहे; माझ्यावर त्याची फार निष्ठा आहे. प्राणाला प्राण देईल! मी असेन

तिथं आपण असायचंच, असा त्याचा निर्धार आहे. आणि म्हणूनच तो माझ्या-बरोबर मंडळांत सामील झाला आहे.

**बाबा०**:—त्यांचे आमच्यावर फार उपकार आहेत!—हं राजीव, चालूं द्या हात. प्रयाग संकोच धरूं नका. (राजीव, प्रयाग वगैरे फलाहार करतात.)

**जयं०**:—(स्वगत) राजीव! पूर्व परिचय नसतांना या जयंतीच्या जिवांत तुमचा जिव्हाळा कां बरं जागृत व्हावा? हृदयाचं महाद्वार खोलून, मनाच्या मेघ-डंबरींत–प्रीतीच्या रत्नखचित सिंहासनावर–तुम्हांला तिनं कां बरं बसवावं? जनता जनार्दनाची आराधना करण्याकरितां आजन्म आपण एकजीव असावं, असं तिला कां बरं वाटावं? राजीव! अहाहा! नांव तरी किती गोड! भाषण तरी किती मधुर! आणि रूप तरी किती रुबाबदार!–राजीव! राजीव! राजीव! एका क्षणांत या जयंतीला कोणत्या नवीन सृष्टींत आणून सोडलीत!

( पद ८—राग भीम पलास झपताल. )

**फुलत फुल बगिचा। दिल हा खुला साचा। प्रेमा लुटाया चतुरा प्रिया या या ॥ ध्रु० ॥ हंसऱ्या गुलाबा। बहरल्या लीला ॥ गाती परागांत। जीवा झुलाया ॥ १ ॥**

**बाबा०**:—पुष्कर आणि त्याचे समानवयी सैनिक आम्हांला फार मदत करतात बरं?

**राजा**:—पुष्कर सारखी मुलं–जयंतीदेवी सारख्या कुमारिका–जनतेच्या हिताक-रितां जिवापाड मेहनत घेत आहेत, आणि आमचे राजे नांवाचे विक्रमराज असून, लोककल्याणाचा विचारही मनांत आणण्याचे श्रम घेत नाहीत! निर्लज्ज! निव्वळ पशु! बाबासाहेब, तुम्हांला राग येतोसं दिसतं; पण मी राजाला शिव्याच देणार!

**बाबा०**:—त्या बिचाऱ्याला शिव्या देऊन काय उपयोग! ते दिवाणाच्या हातातलं एक बाहूलं आहे. दिवाणानं वाटेल तो अन्याय करावा आणि खरं खोटं कांहीं एक न पाहतां राजेसाहेबानी नंदीबैलाप्रमाणं त्याला संमती द्यावी.

**जयं०**:—मी म्हणतें आमचे राजेसाहेब म्हणजे एक लांब कानाचे आणि हात-भर शेपटाचे गर्दभराज आहेत! दिवाणाच्या दडपशाहीला त्यानं काय म्हणून मान वाकवावी? राजेपणा गाजवायला त्याला कुणी बंदी केली आहे कीं काय? राजानं मनांत येईल ते केलं पाहिजे.––नकोकां? आपण मर्द आहों, नामर्द नाहीं, याची त्याला सतत जाणीव पाहिजे.

राजाः—अगदीं बरोबर ! या वेळी जर राजा इथं असतां, तर जयंतीदेवी तुमचं हे सर्टिफिकीट ऐकून त्याचा चेहरा फोटो घेण्यासारखा झाला असता ! बरं, बाबासाहेब, पुढच्या रविवारीं सभा बोलवणार ना ? माझी एकदां सर्वांशी ओळख होऊन जाऊं द्यां. बरं मी येऊं आता ? जयंतीदेवी येतों आम्ही. ( राजा, दयाळ, बाबासाहेब, पुष्कर वगैरे जातात. पडदा पडतो. )

---

# अंक २ रा.

—:०❀०:—

## प्रवेश १ ला.

—*—

[ स्थळः—बाबासाहेबांच्या घरांतील एक दालन. विश्राम हातांत मायभूमी नांवाचें वर्तमान पत्र घेऊन येतो. ]

विश्रा०:—( स्वगत ) ही " होम इंडस्ट्रीजची चळवळ हां हां म्हणतां उधळून टाकीन अशी प्रतिज्ञा करून मी इथं आलों. पण माझ्या प्रयत्नाला न जुमानतां चळवळीचं स्वरूप जास्तच भयंकर होऊं लागलं आहे. त्यांत या राजीवांचा धूमकेतूसारखा अचानक उदय झाल्याकारणानं तर मला सर्वत्र निराशा भासूं लागली आहे. या राजीवाची काम करण्याची धडाडी पाहिली, कां हा माणूस नसून सैतान असावा असं वाटतं. वर्तमानत्रांत लेख लिहून आणि जाहिरपत्रकं काढून, मी चळवळीचा मूर्खपणा प्रतिपादन करायला लागलों, तर त्यानं " मायभूमी " नांवाचं दैनिक काढून, टीकेचा असा भडीमार सुरू केला, कीं जो तो आमची टरच उडवूं लागला. व्याख्यानांनी लोकांची मनं वळवावी, म्हणून जंगी जाहीरसभा बोलावून पाहिल्या; पण सभेच्या ठिकाणी जावं, तर सगळा शुकशुकाट ! बरं, त्यांच्या बाजूची सभा असली, की ही गर्दी !, पाऊल ठेवायला जागा नसते ! राजीवाची आणि जयंतीची भाषणं ऐकतांना लोक चित्रासारखे तटस्थ होतात ! पण त्याच जागी मी परवानगी घेऊन बोलायला उभं रहावं, तर "शेम शेम " "हुर्यो हुर्यो" करून लोक इतका गलबला करतात कीं मुकाट्यानं खाली बसणं मला भाग पडतं ! काय करावं आतां ? बाबासाहेब आणि जयंती यांच्या काबूंत सारे चळवळे आहेत, आणि ही

चळवळही खरोखरच शान्ततामय आहे, म्हणून या घरांत मी आज सुखरूप आहे, नाही तर या लोकांनीं एव्हांना मला इथून पळवून लावलं असतं. बरं, आज ही 'मायभूमी' काय म्हणते, तें पाहूं. ( वाचूं लागतो—नंदिनी येते. )

**नंदि०:**—का ? काय चाललं आहे ?

**विश्रा०:**—कांही नाही. ही मायभूमी वाचतो आहे.

**नंदि०:**—आम्हांला पाहूं देतां का जरा ?

**विश्रा०:**—कां नाहीं ! घ्या. ( देतो )

**नंदि०:**—थँक्यू. ( वाचूं लागते )

**विश्रा०:**—( स्वगत ) मनाला खेंचून घेणारी ही बिनमोल बिजली जर इथं न चमकती तर माझं जीर्ण आज मला नरकासारखं भयाण वाटलं असतं ! पण नंदिनीच्या पाणिग्रहणाच्या आशेनं मी तिची प्रेमयाचना करूं लागल्यामुळं आज स्वर्गाच्या मार्गात मी गिरक्या घेतों आहे, असंच मला वाटतं आहे.

**नंदि०:**—आपण जाणार का नाटकाला ?

**विश्रा०:**—नाटकाला ? कसलं नाटक ?

**नंदि०:**—आपली नजरच गेली नाही वाटतं ? ही एवढी चार फर्लांग ऐसपैस जाहीरात कशी आपण पाहिली नाहींन ?

**विश्रा०:**—कुठं ? जाहीरात आहे ? नाटकाच्या जाहीरातीवर बायकांची नजर कशी चटकन् जाते ! कारण नाटकाच्या खऱ्या शोकी त्याच !

**नंदि०:**—त्याच हो—त्याच ! पुरुषांना नाटकं पहायला नकोच हवीत जशीं कांही ! खरं ना ?

**विश्रा०:**—हो—हो ! ती जाहिरात वाचा पाहूं ?

**नंदि०:**—नाही वाचीत ! लग्नाच्या आधी एवढा हुकूम !

**विश्रा०:**—बरं इकड द्या, आम्हींच वाचतो.

**नंदि०:**—नाहीं देत आम्ही ! आम्हीच वाचणार !—'खादी प्रसारावर पहिलं नाटक !"

**विश्रा०:**—खादीवर नाटक ! खादीवर नाटकं होऊं लागली का ! पाहूं—पाहूं !

**नंदि०:**—मी वाचते ऐका ! "नवा खेळ ! नवा खेळ ! खादीचें नाटक ! खादीचे देखावे ! खादीचे पोषाख ! "

**विश्रा०:**—वाः ! सगळंच खादीचं ! पात्रं नाहीत कां खादीची ?

**नंदि०:**—पात्रं खादीचीच असतात! त्यांना खायला द्यावं लागतंच! ऐका " रागिणी संगीत नाटक मंडळी–शनिवार ता. २४ माहे आक्टोबर सन एकोणिसशे वीस रोजी रात्रौ साडेआठ वाजतां सुप्रसिद्ध पुढारी व मायभूमीचे संपादक श्री. राजीव कृत!—

**विश्रा०**—अरे वा! राजीव नाटकंही लिहूं लागला वाटतं.

**नंदि०:**—ऐका! " राजीव कृत ' राजरंजन ' या हस्तकला व खादीप्रसार या विषयावर लिहिलेल्या नवीन नाटकाचा प्रयोग करून दाखवितील. व्यवस्थापक –चंदन वंदन. "

**विश्रा०**—आतां हद्द झाली! या खादीवाल्यांनी आतां सगळीकडून कहर केला! व्याख्यानं झाली–वर्तमानपत्रं निघालीं–आतां नाटकावर मजल आली! आमच्या परदेशी व्यापाऱ्यांची खूपशी नालस्ती असणार या नाटकांत!

**नंदि०:**—आपलंही पात्र घातलं असेल कदाचित!

**विश्रा०:**—माझं? छेः राजीव असं नाही करणार.

**नंदि०:**—भरंशाच्या म्हशीला टोणगा! लेव्यागोबत्यांची पात्रं नाटकांत घालून प्रतिष्ठितपणानं त्यांची नालस्ती करणारा नाटककार नसतोच असं नाही.

**विश्रा०:**—बरं घालू दे! घातलं तर घातलं आमचं पात्र! लोक टवाळकी करतात, त्यांत आणखी भर! आपण कांही या नाटकाला गेल्यावांचून राहणार नाही. आपला काय बेत आहे?

**नंदि०:**—माझा? काय बेत असायचा! नाटक परवां आणि आम्हीं तर उद्यांच मुंबईला जाणार!

**विश्रा०:**—मग परवां नाटक पाहून तेरवां जा! दोन दिवसांनी काय होतंय?

**नंदि०:**—नाटकाचं नुसतं निमित्त! आपल्याला मी आणखी रहायला पाहिजे म्हणून हा आग्रह चाललाय झालं? होयना? हं–मला वाटलंच! नाहींतर नाटक आपल्या मतांविरुद्ध आणि ते पहायचा कशाला एवढा आग्रह कराल! नाटक दाखवून मला पुरी खादीवाली करायची आहे वाटतं?

**विश्रा०:**—हें पहा, आपण नाटक पहायचं तें निव्वळ गमतीखातर, त्याचा परिणामबिरीणाम नाही होऊं देतां कामा मनावर. नाहीतर उद्यां नाटक पहाल, आणि परवांपासून खादीचं व्रत अमलांत आणून, आमच्याशीच सत्याग्रह कराल!

**नंदि०:**—मी तरी काय म्हणतें! तेंच! नाटक चांगलं असलं तर परिणाम होऊं द्यायचा नाहीं म्हणून निश्चय चालेल का? आपण परवां नाटक पहायला रहानों. पुढं काय होईल त्याबद्दल आपण नाहीं जबाबदार!

**विश्रा०:**—बरं आम्ही तें पाहून घेऊं. हल्ली तुम्ही कधीं कधीं खादी नेसताच आहांत—

**नंदि०:**—नेसावीच लागते! जयंतीताईबरोबर हळदीकुंकवांना-सभांना जावं लागतंना? सगळ्या खादी नेसणार-आपण नाहीं!-वाईट नाहींका दिसत?—बरं न जावं तर लोक म्हणायचे 'या शिकलेल्या-बी. ए.! अडाणी बायकांत कशाला येणार! शिवाय आतां-आपल्या-( मुरका मारते. )

**विश्रा०:**—हं म्हणा-म्हणा-आमच्या अर्धांगी होणार! म्हणा—

**नंदि:**—इश्श! पण कधी कधी खादी नेसली म्हणून काय होतं?

**विश्रा०:**—काय होतं? मनाचा बेरंग होतो! प्रणयीवृत्तींचा भंग होतो. सुधारणेची रोषनाई विझून जाते, आणि रानटीपणाची राकट पणती पाजळल्या-सारखी वाटते.

**नंदि०:**—अगबाई! मला खादी नेसलेली पाहून आपल्या मनाचा इतका का चित्त क्षोभ होतो! आपल्याला खादीच्या पोषाखांत पाहून मला काय बरं वाटेल! काहीं कल्पना नाहीं होत! हे बाबासाहेबाचे कपडे आपण जरा घाला पाहूं! मला काय वाटतं, तें पाहूं द्या. घालाना घाला—अंगांत—

**विश्रा०:**—छे: प्राण देईन पण खादीला स्पर्श करणार नाहीं!

**नंदि०:**—पण मला नुसतं थोडा वेळ नजरेनं पहायचं आहे. मी कांहीं नेहमीं घाला म्हणून नाहीं सांगत ते कपडे! खरंच, हा तलम रेशमी शर्ट, गळ्याला दोन इंच उंचीची स्टिफ कॉलर, वर एक स्ट्रॉ्पसचा नेकटाय आणि या सर्वांवर फर्स्ट क्लास ब्ल्यू सर्जचा सूट, पायांत क्रोम लेदरचा बूट, डोकींत अपटुडेट हॅट, अशा थाटांत मी आपल्याला पुष्कळच पाहिलं आहे, पण खादीच्या—

**विश्रा०;**—खादीचं नांव काढूं नकोस! तुमच्या नाजुक मुखांत खादी हा राकट शब्दच शोभत नाहीं. नाजुकपणाचा अर्क काढून देवानं ही नाजुक नवरी उत्पन्न केली ती नाजुक नजरेला नामोहरम करण्याकरितांच! या झिरझिरीत फ्रेंच गॉझ-मधून डोकावणारे तुझे मोहक अवयव चिकाच्या पडद्यांमधून चमकणाऱ्या सुंदर



मालिनी—दावूं का तुला ती नववरी । ( पान २९ )

मनोरंजन प्रेस, मुंबई ४.

युवतीप्रमाणं नेत्रकटाक्ष फेंकून मनाला बेजार करतात आणि नजरेशी स्पर्धा करणारे मत्सरी बाहु उपभोगाकरितां आतुर होऊन एकदम त्यांना असा वेढा घालतात. ( आलिंगन देतो. इतक्यांत मालिनी येते. )

**मालि०:**—छान पकडलीस! मला चूकवून आलीस नाही! चल—चल आतां माझ्याशी खेळायला! ( नंदिनीस ओढूं लागते. )

**विश्रा०:**—माले! बाळ, मला पापा दे.

**मालि०:**—मी नाही देत जा. तूं खादी वापरीत नाहींस.

**विश्रा०:**—आतां काय करावं या मुलांना? जन्मापासून हा स्पिरीट!

**नंदि०:**—बरं मला देतेस का एक पापा?

**मालि०:**—खादी नेस—म्हणजे देईन! नाही देत वाटतं खादी नेसल्यावर? बाबा, ही किनई मला एकदां म्हणत होती—सांगूका काय म्हणत होतीस ते?—

**नंदि०:**—हं. मालुताई, ( दटावते )

**मालि०:**—आतां मालुताई म्हणाल—मालिनीबाई म्हणाल—मालिनीबाई साहेब म्हणाल, पण मी कांही बाबांना सांगितल्यावाचून सोडायची नाहीं समजलांना?—आई?

**नंदि०:**—चावट मेली! ( चापटी हलुच गालांत मारून )

**मालि०:**—लागलीस का शिव्या द्यायला अन् मारायला इतक्यांतच ( रडक्या-स्वराने ) बाबा! मला आईन मारलं! अँ अं अं!

**नंदि:**—आतां इथं उभं राहयला नको. ( जाऊं लागते. )

**मालि०:**—चाललीस कुठं? बाबा,—

( पद्य ९—राग )

**दावूं का तुला ती नव नवरी। बाहुली फुलारी॥धृ०॥ रंगरूप शिरिं कुंतल सुंदर। नाचत नवरस गौरी॥ दडुनि बैसली नाजुक नटवी। खादी पैरनवाली॥ १॥**

( नंदिनी जाते. )

**मालि:**—( टाळ्या पिटून ) कशी पळाली! कशी गंमत झाली! बाबा माझ्याशीं जरा खेळ! आपण या खुर्चीची गाडी गाडी करूं. चल

**विश्रा०:** —मला नाही वेळ खेळायला!

मालि०:—आपल्या मुलीशीं तेवढा नाहीं वेळ खेळायला ! नंदिनीताईशीं आहे ?

विश्रा०:—( हात जोडून ) बरं बाई, खेळतों तुझ्या बरोबर ! सांग काय खेळूं ?

मालि०:—तूं खुर्चीची गाडी कर—मी टेबलाची करतें—हं म्हण गाडी—गाडी—छूम ! चलो गाडी—गाडी छूम ! नाही नाहीं गाडी नाही आगगाडी ! चला फूः फूः फूः फूः फूः—

( विश्राम खुर्ची व मालिनी टेबल ओढीत नेतात )

## प्रवेश २ रा.

—:०:—

[ स्थळः—थिएटर-प्रेक्षकगृहाचा देखावा-सभागृह प्रेक्षकांनीं भरून गेलें आहे. आर्चेस्ट्रांत रंगभूमीसमोर कोच व कांही खुर्च्या रिकाम्या- रागिणी व मॅनेजर चंदन येतात. ]

चंद०:—पहा, व्यवस्था आहे का नाहीं जय्यत ?

रागि०:—चंदनराव ! महाराज नाटकाला येणार म्हणून इतक्यांत हुकूम आला आणि इतक्या थोड्या वेळांत इतकी व्यवस्था ! शाबास ! तुमच्यासारखे हुशार मॅनेजर आहेत म्हणून आम्हाला पाहावं लागत नाहीं.

चंद०:—आज राजरंजन नाटकाचा पहिलाच खेळ. तेव्हां थिएटर पताका वगैरे लावून शृंगारलेलं होतंच. फक्त-खास बैठकीची व्यवस्था करावी लागली. पानसुपारी हारतुरे अत्तरगुलाब यांची दामुअण्णांनीं तयारी चालवली आहे. आतां दुसरं कांहीं नाहीं; सरकार स्वारी आली कीं पडदा उघडायचा.

रागि०:—पण त्यांना उशीर नाहींना होणार यायला ! साडे आठला सुरवात झाली नाहीं तर लोक सरकारबिरकार पाहाणार नाहींत, टाळ्या पिटून त्रास देतील.

चंद०:—त्याची आपल्याला काळजी नको. "बरोबर साडे आठाला येतों- सुरवात करा" असाच हुकूम आहे.

रागि०:—बरं, बाबासाहेब, जयंतीदेवी वगैरे राजीवांच्या मंडळींच्या सीटस—

चंद०:—या पहा, रिझर्व ठेवल्या आहेत. आहेत ?

रागि०:—शाबास! आजचा प्रयोग एकदां नीटपणानं पार पडला म्हणजे मिळवली! एक नवं नाटक म्हणजे नाटकवाल्यांच्या नाकीं नऊ येतात. नाटक कंपनी म्हणजे एक सदा उपवर कन्या! तिच्याकरितां प्रथम एक नवरदेव नाटककार हुडकून काढायचा! हुंडापांडा ठरवून त्याच्या जवळून नाटक हातांत पडलं की तिचं लग्न लागलं. मग तें नाटक पास करून घेणं, तालीम घेऊन बसवणं, सिनसिनरी कपडालत्ता करणं म्हणजे एक त्रासदायक गर्भारपणच! पहिला प्रयोग म्हणजे बाळंतपण. प्रसूती नीट होऊन बाळबाळंतीण निभावणं म्हणजे प्रयोग लोकप्रिय होऊन पैसा मिळणं! तें झालं नाहीं तर तें अपेशी कार्ट नाटक तर मरतंच पण बाळंतीण ही ठार होते.

चंद०:—पण या नाटकाचा तर तसा त्रास पडला नाहींना? फुकटचं नाटक, फुकटचे कपडे, फुकटची सिनसिनरी! व—

रागि०:—आतां तें लोकप्रिय झालं आणि महाराज सरकारकडून आम्हांला आश्रय मिळाला म्हणजे झालं!

( केशरचंद, व चूचाँग येतात. लोक ' शेम शेम, ' हुपहुप हुयों ' करतात. )

रागि०:—मॅनेजर, नाटकाला फक्त माणसंच आंत घ्यायचीं असतात नां? मग हें काय?

चंद०:—काय-काय-काय झालं?

रागिः०—माकडासारखं तोंड करून ' काय काय ' काय ' विचारतां? तें माकड कसं आंत आलं?

चंद०:—कुठं? कुठं? आतां हांकलतों बाहेर.

रागिः०—तें पहा-तें अहो तें! तो चूचाँग.! हें पहा, त्याला घरीं यायची बंदी करा. मला फार त्रास होतो. त्याला वाटतं पैसा असला कीं माकडाचा मदन होतो.

( पद १०—राग मांड पहाडी. )

**श्रीमंतांच्या कां या वाया कल्पना । कधीं न प्रेम धांवल्या धनांत । मर्कटसंगें रंगें केवि भावना ॥ ध्रु० ॥ मेघास चुंबन देतां पावते विद्युत् पाता । गोता देते वासना ॥ १ ॥**

( घंटा वाजते ) अगबाई! पहिली बेल झाली! मला सजलं पाहिजे लौकर. बाकी आज कांहीं फार सजायचं नाहीं. तोंडाला आणि हातापायाला रंग लावायचा आणि खद्दीचं पातळ नेसायचं—बरं मी जातें आंत.

चंद०:—मी येतोंच. मलाही बाहेर जायचं आहे. ( रागिणी व मॅनेजर आंत जातात.)

चूचाँ०:—केंशरचंद ! रांगिणी—रांगिणी अंत गेलीं ?

केश०:—मरूं दे ती रागिणी ! अजून दिवाकर नायं आला ! ( चूचाँग घड्याळ कानाला लावतो त्यास ) किती टाइम झाला ?

चूचाँ०:—बान्रा वांजलें !

केश०:—बारा वाजले ! तुमचा घड्याळाचा बारा वाजला खरा. सव्वाआठ होऊन गेले बघा इथं ? बारा वाजले ! घड्याळ कशाला वापरते ?

चूचाँ०:—तुंमी घंद्याळ ताईम बंधायला ठेंते ? ताईम पेछां तिंक तिक किती गोंद लांगते ! चिन्नी तिक तिक बंगते–अहाहा ! तिक तिंक ! तिक तिंक ! तिंक तिंक !

केश०:—घड्याळाची कोरडी टीक टीक आमाला नाय आवडते. रुपयाचा छन छन् आवाज आम्हांला गोड वाटतो.

चूचाँ०:—तिक तिक ! घंद्याळाचा तिक रुपयांचा तिंक! तिक सारखा गोंद वांततो, अहाहा ! तिक तिक तिक तिक !

केश०:—दिवाकर आलाच ( दिवाकर येतो " शेम शेम " होतो ) या दिवाकर तुम्हाला शेम शेम होतो तो चूचाँगला हुपहुप हूर्यो होतो.

दिवा०:— तसं नाही ! चूचॉगना " हिप हिप हुरे ? " होतं, ( केशरच्या कानांत ) आजचा बार जर बरोबर उडाला तर या शेम शेम हूर्योचा बरोबर सूड घेतों. अजून तो माणूस आला नाही ?

केश०:—त्याचा तो सीट है पांच रुपये देऊन तिकीट घेतलं है. तो पहा आलाच खादीचा टोपीवाला. ( खादीचा पोषाक घातलेला मारेकरी सीटवर येऊन बसतो. विश्राम येतो " शेम शेम " असा ओरडा. नंतर मॅनेजर, बाबासाहेब, जयंती, नंदिनी, पुष्कर, मालीनी वगैरे येतात–टाळ्या होतात व जयंती देवीकी जय !! असा गलबला )

जंय:०—( मॅनेजरास ) राजीव आले आहेत का ?

चंद:०—अद्याप आले नाहींत—पण इतक्यांत येतील. कदाचित आंत आलेही असतील.

जयं०:—त्यांना इथंच बसायला घेऊन या.

चंद०:—ते आज आंतच राहणार आहेत. पहिला खेळ आहे. कांही सूचना वगैरे द्यायच्या झाल्या तर जवळच असावं म्हणून ते आंतच बसणार आहेत.

जयं०:—हो, आज त्यांचं पहिलं अपत्य जन्माला येणार, नाही ? महाराज सरकारकरता तयारी आहे वाटतं ही. खेळ वेळेवर सुरू होणार ना ?

चंद०:—अगदी टाइमशीर ! बरं मी येतों आतां ( चंदन जातो ).

जयं०:—( स्वगत ) राजीवांच्या राजरंजनाला राजेसाहेब हजर राहणार ! योग कांही अपूर्व आहे. बाकी राजीवांचं नाटक राजेसाहेबांना कसं काय रुचतंय तें पाहाणंच आहे !—पण आज राजीव बाहेर बसले तर नाही का व्हायचं ? त्यांना पाहाताच हा खादीचा समुद्र आनंदाच्या लाटांनी उचंबळायला लागेल. पुढाऱ्यांची कृति लोक किती प्रेमानं पाहातात हें राजेसाहेबांना आणि राजीवांना दोघांनाहीं पाहायला सांपडेल. नाटकाच्या रंगदार प्रसंगाच्या वेळी प्रेक्षकांकडून होणाऱ्या टाळ्यांच्या कडकडाटात राजीवांचा चेहरा खुलून जाईल. राजीव ! आज रंग कांही और आहे ! तुम्ही इथं बसायला याच.

नंदि०.—तो कोण मनुष्य ? असा कावरा बावरा कां बरं बघतो ? खादीचा पोषाख आहे पण मुद्रा अगदी खुनी दिसते, पाहिलंस ना ?

जयं०:—मुद्रेवर काय आहे ! अग, राजीवांची मुद्रा राजेसाहेबांच्या मुद्रेसारखी नाही का ? पण राजेसाहेबांच्या अंगांतला राक्षसीपणा राजीवात आहे का ? राजीव आणि राजा ! राजा आणि राजीव ! राजाला पाहातांच लोकांच्या अंतःकरणांत आग पेटलेली असली तरी नाइलाजानं ते नकली आनंदाचं प्रदर्शन करतात आणि राजीवांचं दर्शन होतांच स्वयंस्फूर्तीची कारंजी उडून अमृताची गंगा वाहूं लागते !

( पद ११—राग तिलक कामोद त्रिताल. )

**झरत रसिकता निर्झर शशिमणि । बघुनि उदित सुधांशु शांत दांत ॥ ध्रु० ॥ धांवे देशहिता रणिं । त्या मान्या मानपान ॥ १ ॥**

( स्वगत ) अहाहा ! राजीव ! राजीव ! माझं मन या वेळी राजीवाशी—राजीवांच्या मूर्तीशी तादात्म्य पावलं आहे. ( आंत टाळ्या वाजतात. ) ऐका हा टाळ्यांचा गजर ! राजीवच आले असतील. ( मॅनेजर व नंतर भालदार ललकारत येतात—त्यांच्यामागून राजा, सय्यद, दयाळ वगैरे लोक येतात. )

**भाल०:**—श्रीमन्महाराजाधिराज राजराजेश्वर श्री विक्रम महाराज खर्डा ताजीम नजर दौलत जावा !

**जयं:०**—राजीव ? नाही राजा ! पण हुबेहुब राजीवच !

( राजा, दयाळ, सय्यद येतात. राजासमोर मारेकरी येऊन )

**मारे०:**—प्रजेच्या पैशावर पोसलेल्या पोळा, घे आपल्या पापाचं प्रायश्चित्त, ( खंजीर काढून राजावर धावतो. जयंती धावत जाऊन राजाच्या छातीपुढं एकदम उभी राहाते तिच्या खांद्यावर जखम होते. लोक 'हां हां पकडा त्या हराम-खोराला ' म्हणून ओरडतात. सय्यद मारेकऱ्यांस पकडतो. राजा पडलेल्या जयंतीचा चेहरा पाहून दचकतो. दयाळ जखम बांधू लागतो. लोक जवळ येतात. )

**राजा:**—ही कोण ?

**बाबा०:**—जयंती ! जयंती ! माझी मुलगी जयंती !

**राजा:**—कोण बाबासाहेब ? आपल्या मुलीनं आज माझे प्राण वांचवले ! मला जिवदान दिलं ! तिचे माझ्यावर अनंत उपकार आहेत. डॉक्टर ! जखम जबर नाहीं ना ?

**दया०:**—रक्त सारखं वाहत आहे, बंद होत नाहीं. इथून यांना लवकर हालवलं पाहिजे. नाहीं तर—

**राजा:**—असं ! मग जलदी करा. यांना आपल्या पॅलेस हॉस्पिटलमध्येंच न्या. बाबासाहेब, आपण आपल्या मंडळीसुद्धां तिकडे यायला हरकत नाहीं. परमेश्वरा ! तुझ्या आशीर्वादानं मला आज पुनर्जन्म मिळाला. ( पडदा पडतो. )

## प्रवेश ३ रा.

—:०:—

[ **स्थल**—बाग—रागिणी येते. ]

**रागि०**—( स्वगत ) कोण बाई ती भयंकर कालची रात्र ! अगदीं पडदा उघडावयाची वेळ !—भालदाराची ललकारणी ! महाराजांचं आगमन !—खुनी मारेकऱ्यांचा हात !—आणि जयंतीदेवीच्या अगांतून रक्ताच्या चिळकांड्या !—नकोच बाई ती आठवण ! तो देखावा !—कमले आमचे रंगभूमीवरचे देखावे !



राजा—हा कोण ?

( पान ३४ )

मनोरंजन प्रेस, मुंबई ४.

खरं तें खरं आणि खोटं तें खोटं ! कांहीं केल्या मनावरचा परिणामच कमी होत नाहीं. कुठंही पहा, कालचं चित्र दिसतं ! ही पूर्वेची रंगभूमि पहा. रविउदयाचे वेळीं रक्तासारखी लाल माखलेली—अगदी कालच्यासारखीच ! पहांटेचा पडदा वर जायच्या वेळीं, भारद्वाजाच्या ललकारीबरोबर, रविराजाचा खून करण्याकरतां तमासुराच्या उचललेल्या सुऱ्याचा आघात, उषादेवीनं स्वतःच्या हृदयावर घेतला, त्या वेळीं ज्या रक्ताच्या चिळकांड्या उडाल्या, त्यांनीच हें पूर्व क्षितिज, लालबुंद झालं आहे.

( पद १२—राग भूप ताल त्रिवट )

**भेसुर या रुधिरमय नभांत । गर्जत कृतांत । खुनी खुनी खुनी । ध्वनिहि दशदिशांत ॥ ध्रु० ॥ उदयकालिं रविराया । मत्त तिमिर वेधित उरिं । क्षणांत धांवे उषा हृदयिं त्या झेली ॥ १ ॥**

रात्रीं झोंप नाहीं ! उजाडतांच थिएटरवर पोलिसचा पहारा ! इकडचं मनुष्य तिकडे फिरकूं देत नाहीत, जसा कांहीं आम्ही महाराजांना नाटकाचं आमंत्रण त्यांचा खून करण्याकरतांच केलं. आम्हांला त्यांचा प्राण घेऊन राज्य का कमवायचं आहे ? आमचं नाटकी राज्य आहे तें नीट चाललं म्हणजे झालं ! लाचखाऊ लोक आमच्या अंगाचे आतां लचके तोडून खातील. नाटक तर बंद होणार; पण वर कांहीं प्रायश्चित्त न मिळो म्हणजे झालं ! या दिवाकरांनी कां बोलावलंय कुणाला ठाऊक ? ( दूर पाहून ) अग बाई ! तो चूचॉंग इकडेच येतो आहे ! पाहिलंन कीं लागेल खविसासारखा माझ्या मागं. या झुटपाआड व्हावं मग चुकला तर चुकेल प्रसंग. ( रागिणी लपते, चूचॉंग येतो. )

**चूचॉंः०**—( स्वगत ) खांदीवाला मरनार अन्नी आंच्या फक्तरी अंता उंम्या व्हंन्नार ! आंचा कांपड निंगनार अन्नी खांदी मांरी वुन्नार ! मंग अम्माला रांगिणी मिल्नार ! आंचा फॉक्तरीमंदी मांजी–केंशरचंदची आन्नी दिवाकरची भंगी हंन्न पण रांगिणींत भुंगीन्ना रांगिणी मांजी–मांजीच ! चिन्नीचीच ! चूचॉंगन्चीच ! ( गातो व नाचतो )

( पद )

**सी क्कांग चिंग् चॉंग आंची । नी नोंग हॉंग कांग बूं ग-मी ॥ चो पेन् बिन टॉंग पेंकीनी । बिंग मुंग यांग स्सीं रांगीणी ॥ रांगिणी । रांगिणी ॥ १ ॥**

( आंत केशरचंद व दिवाकर " चूचाँग " हांक मारतात व येतात. )

**दिवा०:**—वाः चूचाँग, तुम्ही इकडे आलांत का? असे नाचतां काय लहान मुलासारखे?

**चूचाँ०:**—मी लहान मुंलंच हींग! चिन्नी मुंलंच हींग! उंची वांदले! उंमर वांदलें बांकी लंहान मुंलंच हींग. मी छोंता पोंताच हीन्! ( नाचतो. )

**दिवा०:**—वाः आज स्वारी फार खुष दिसते.

**केश०:**—आपुनभी आज खुष है. आज आमच्या मनाषारखा झाला

**दिवा०:**—आणि मी कुठं नाही खुष? आपल्याला हवं होतं ते झालं. आतां राजेसाहेब वांचले—वाचूं द्या. त्यांच्या आयुष्याची दोरी होती सबळ! काळ आला होता पण वेळ आली नव्हती. जाऊंद्या. आतां मन मानेल तशी धामधूम करा जयंती मरतेच आहे. राजीवाला शिक्षा झाली, की आतां दोन दिवसांत चळवळ थांबते पहा. विश्राम बसला व्याख्यानं देत. ही कामं का अशी होतात? आपण कसा एक मवाली पाहिला आणि काम करून घेतलं.

**रागि०:**—अग बाई! या कसाबांचं हें कारस्थान तर!

**चुचाँ०:**—पंग तो फुंटनार नांन्ना? मांज नांव संगेल नान्ना?

**केश०:**—कांहीं भिऊं नको. दिवाकरसमोर त्यानं शपथ खाल्ली है. " कुठं बोलणार नही. " दिवाकरनीवी त्याला शिक्षा होऊं देणार नहीं म्हणून सपथ दिले नहि दिवाकर?

**दिवा०:**—हो हो. नाही कोण म्हणतो? हे चूचाँग नव्हते का त्या वेळीं? काय चूचाँग? आतां तयारी करा गिरणीची.

**रागि०:**—( स्वगत ) गिरणीची कसली? आपल्या मरणाची कर लवकर तयारी!

**चूचाँ०:**—पंग रांजा जिता रांनला—मेनला नां—तो मेनला पांजे व्हंता.

**केश०**—चूचाँग, तो नाही मेला हाच बरा झाला. आमी जैन है. आमच्या धर्म सांगते " अहिंसा परमो धर्मः " हिसा नही झाली ब्येश झाली. नहि दिवाकर?

**दिवा०:**—बरं झालं झालं! मी सुद्धां हत्येच्या विरुद्ध आहे आम्ही वैष्णव राजाला विष्णूचा अवतार समजतों.

**चूचाँ०:**—आम्ही सुद्धां बौद्ध धर्मी! गौतम बुंद्ध गुरु! हंता हिंनंसा ना कंते! शुद्ध हिंसा ना कंते!

**दिवा०:**—ना कंते तर काय करते ? तुम्ही चिनी तर बेडूक खातां ! मुंग्यांची कढी भुरकतां ! आणि झुरळांची आमटी मटकतां ! हंता ना कंते ! अहो जाऊंद्या. हत्या कोण नाहीं करीत ? हत्या होणं हा निसर्गाचा सिद्धांतच आहे. अहो, म्हटलंच आहे,—" जीवो जीवस्य जीवनम् " सगळ्या दुनयेंत काय चाललं आहे ? युद्धं आहेतच चालू ना ?

**रागि०:**—धार्मिक तत्वज्ञानाचे तारे तुटताहेत. वाःरे धर्ममार्तंड ! अस्सल गळे-कापूंच्या टोळीलाही तुम्हीं खालीं पाहायला लावाल !

**दिवा०:**—जाऊं द्या.–महाराज वांचले तर वांचले ! जयंती मेली तर मेली ! आतां फॅक्टरीज बांधा जोरांत. मी आज राजीवांवर वारंट काढतों सय्यदअल्ली जवळून. काय पकडीत नाहीं आतां ? खुनी माणूस राजीवाचा साथीदार आहे. तो राजीवांबरोबर नाटक कंपनीत तालमीच्या वेळीं जात येत असे, असा पुरावा बरोबर तयार करतों. तो मवाली सांगणारच आहे तसं. मी आतां त्या नाटक कंपनीच्या मालकिणीला वळवून घेणार आहें. येईल आतां धडपडत अवदसा. ती काय विरुद्ध जाते ? मूठ दाबली की पढवूं तें तिनं बोललंच पाहिजे. तिला काय ? नाट-कांतीलच एक नक्कल बोलायची. तो मवाली पोपट आणि ही रागिणी मैना, नीट बोलली कीं राजीवाची तळई उचललीच !—

**रागि०:**—मी मैना ? खरोखरीच मैना. नाटकांतील नकलेपुरती नटी. पण चांडाळानों, तुम्हीं सावाचीं सोंगं घेतलेले जातिवंत नट आहां.

**चूचाँ०:**—रागिणी हींग ? हींग ?

**केश०:**—चूचाँग ! मरूं दे तो रागिणी. आज लाख रुपयाचा काम झाला, दिवाकर. आतां समद्या चळवळ्यावर खटले झाले कीं आमचा गिरणीचा कामभी चालू व्हैल. अन आमचा परदेशी कापडभी चांगला खपेल.

**चूचाँ०:**—आंनची चिन्नी खांदी खंपली. उंट्या घंड्या घांतल्या; आन्नी हांत रेंटिया–हांतमांगावरची म्हेन्नून छांप मांल्लन दुंपट भांवानिंग विकली.

**दिवा०:**—शाबास ! याला म्हणतात चिनई शहाणा ! या चिनी लोकांच्याजवळ कसबं मोठीं विलक्षण ! वाटेल तें करतील.

**चूचाँ०:**—आमीं वांटेल तेंग कनतों. राजांचां गंपचिंप खून करूंन बंगा–गंपचिंप ( खिशांतून अफूची डबी काढून ) हिं अफूं ओंपियम ! इंवा ग्यास कनरायचा अन्नीं रंबरी टयूंब मंदून रंजाच्या बेडरूममंदी सोडांयचा. राजा थंडगार व्हांतो.

**दिवा०:**—असं नाहीं ! पण त्याची आतां जरूर नाहीं. आपल्याला या चळवळ्या लोकांनीं अत्याचार केला एवढं भासवायचं होतं, तें झालं. महाराजांनीं मरावं अशी कांहीं आपली इच्छा नाहीं. केशरचंद ! तुमचा पैसा—चूचौंगच डोकं—आणि माझं धाडस, एक झाल्यावर या द्वारमंडळालाच काय पण दुनियेला आग लावूं. आपलं हें त्रिकूट म्हणजे प्रत्यक्ष ब्रह्मा विष्णु महेश ! चूचौंग ! ही पर्वणी आली आहे. यावेळीं आपले खासगी किंवा सार्वजनिक जे जे वैरी असतील त्यांना वैरून टाका. पुनः अशी वेळ यायची नाहीं. ( दिवाकर, केशरचंद, चूचौंग जातात. )

**रागि०**—( स्वगत) काय भयंकर हीं माणसं ! पण माणसं का भूतं ? खवीस, वेताळ का ब्रह्मराक्षस ? आणि हा बगीचा–बगीचा कसला ? हें स्मशान आहे. हे काळकपटी आपल्या पापी पोटांत कांटे भरण्याकरतां कसाबाची करणी करतात, आणि जगाला सन्मार्ग दाखवणाऱ्या सत्पुरुषांना सुळावर चढवून पुनः माळसूद म्हणवून घेतात.—चल—रागिणी—चल. या त्रिकुटाच्या भाषणांतला शब्दन्‌शब्द राजीवांना सांगून तूं त्यांना सावध कर. चांडाळांनो ! मी नायकीण आहें–नाटकी नटी आहें—पण तुमच्या मगळयांच्या शेंड्या आज माझ्या हातांत आहेत.

( पद १३--राग जीवन पुरी )

**राजिव रक्षणिं अर्पिन तनमन । कृतांत जरि ये । तयास तुडविन । ते खल त्रिकुट । मी कपटि नटि । न्याय करिल जग । सार्थ वचन मम ॥ ध्रु० ॥ गुणगुण करि प्रशांत तो वारा । दर्या खवळत तुफान् उसळत । धांवे अस्मान् लाट्ा ॥ १ ॥**

---

# प्रवेश ४ था.

[ **स्थळः**—राजवाड्यांतील एक शृंगारलेला दिवाणखाना, पलंगावर जयंती निजलेली आहे. खुर्ची जवळच दयाळ उभा आहे. ]

**दया०:**—आम्हीं महाराजांचे ए. डी. सी. प्राणरक्षक ! पण महाराजांच्या प्राणांवर गदा आली तेव्हां मात्र आमचा कांहीं उपयोग झाला नाहीं. एका अबलेला तें काम करावं लागलं. पहा ! बिचारीच्या प्राणावर बेतली होती ! आमच्या

महाराजांचं नाटक मात्र आतां पुन्हा चालू होणार हं ! काल शेवट दुःखपर्यवसायीच होत होता पण नाहीं. आतां खास आनंदपर्यवसायी होणार !

जयं०:—( डोळे उघडून ) मी कुठं आहे बरं ! मी इथं कुठं आले !

दया०:—आपण उठूं नका.

जयं०:—कां ? आतां मला बरं वाटतंय. आपण डॉक्टर आहां वाटतं ?

दया०:—होय, मी महाराजांचा खास डॉक्टर आहें. आपल्याला काल जखम झाल्यावर एकदम या राजवाड्यांत.—

जयं०:—राजवाड्यांत ! अगबाई ! हा राजवाडा का आहे ? छेः, एक क्षणभर सुद्धां मी इथं राहायची नाहीं.

दया०:—छे; छे ! आपण अशा जाऊं नका. आपण स्वतःचा जीव धोक्यांत घालून महाराजांचा जीव वांचविलात. महाराजांची समक्ष भेट झाल्यावांचून आपल्याला असंच जाऊं दिलं तर ते मला रागावतील ! आपण जरा थांबा. मी त्यांना आपली इच्छा कळवितों.

जयं०:—ठीक आहे–कळवा–जा. ( दयाळ जातो. स्वगत ) बरं झालं, देवानं मला यश दिलं; आणि महाराजांच्या जिवांवरच संकट टळलं. नाही तर आमच्या मंडळावरच या अत्याचाराचं खापर फुटलं असतं, आणि आमच्याच चिथावणीवरून हा खून झाला म्हणून आम्हाला कैद केलं असतं ! तुरुंगांत रहायला आमची ना नाहीं; पण आमच्या तुरुंगाचा रस्ता शान्ततादेवीच्या मंदिरावरून आहे; रक्तपाताच्या भयाण स्मशानांतून नाहीं.

( पद. १४—राग बागेसरी त्रिताल. )

**वरिति सुजन पथ शांत शांतिचा । ने देशा विभवास ध्यास त्या ॥**
**॥ ध्रु० ॥ पतंग तो हरितां दीपाला । नाशा पावे सिद्धि मिळे ना ॥ १ ॥**

( राजा येतो. )

राजाः—जयंतीदेवी ! गेल्या रात्रीं विलक्षण शूरपणानं आपण माझा प्राण वांचवलात. आपले माझ्यावर अनंत उपकार आहेत.

जयं०:—माझे उपकार कसले ! मी आपलं कर्तव्यच केलं !

राजाः—असं कसं म्हणतां ? तुम्हीं आणि तुमचे खादीप्रसारक अनुयायी यांचा माझ्यावर जो राग आहे त्यावरून तर मी असं म्हणतों कीं, माझा प्राण वांचविण्यापेक्षां तो घेण्यांतच तुम्हांला आनंद वाटायला पाहिजे होता.



जयंती—कारण मला तुमची कांहींच किंमत वाटत नाहीं. ( पान ४० )

मनोरंजन प्रेस, मुंबई ४.

**जयं०**:—छेः छेः महाराज, आम्हीं खुनी-राजद्रोही नाहीं बरं का! खरे राजनिष्ठच आहोंत. आम्हीं तुमचा जीव कां घेऊं? नाहीं बरं, आमची चळवळ अगदीं अनत्याचारी आहे. दुसऱ्यांनीं आम्हांला मारलं तरी उलट हात उचलायचा नाही, हें तर आमच्या मंडळाच मुख्य तत्व आहे. महाराज! रात्रीं ज्या इसमानं आपल्यावर हल्ला केला, त्याचा आमच्या मंडळांशीं कांहीं एक संबंध नाही. आमच्या शत्रूचं हें काम असावं; आणि आमच्यावर कुभांड यावं म्हणून मुद्दाम त्यानं खादीचे कपडे केले असावेत!

**राजा**:—त्याचा निकाल न्यायाच्या कोर्टांत लागेलच. आपण उभ्या कां? बसा या खुर्चीवर. आपल्या हाताला कळ लागलेली दिसते!

**जंय०**:—उगीच जरा. होईल कमी लौकरच.

**राजा**:—आपण साफ बऱ्या होईपर्यंत इथंच राहाल तर बरं होईल. बाकी आपली जायचीचि इच्छा असली तर माझा आग्रह नाहीं. आपण माझा प्राण वाचविण्याकरतां स्वतःच्या प्राणांवर उदार झालांत याचा उतराई मी कसा होऊं?

( **पद १५**—राग मांड त्रिताल )

**राजस बाला। काया कोमल। जीवाचा चारी। घास यमाला ॥धृ०॥**
**नकळे जीवा। काय जिव्हाळा। शिरिं मम राहे। भार कृपेचा ॥ १ ॥**

आपल्याला मी काय बक्षिस देऊं?

**जयं०**:—बक्षिस! तुम्हीं काय मला बक्षिस देणार? एखादा कंठा- जहागिर- का किताब?—मला त्याची मुळींच किंमत नाहीं. कसले तुम्ही राजे?—हांजी-हांजीखोर आणि आपमतलबी लोकांचा तुमच्याभोंवतीं एवढा कडेकोट बंदोबस्त आहे, कीं त्यांतून तुमच्यापर्यंत कुणाची वर्दीहि पोचत नाहीं. तुमच्या कानांत त्यांनीं खुशामतीचे असे घट्ट बोळे घातले आहेत, की रयतेच्या दु:खाच्या आरोळ्या त्यांत शिरतच नाहींत. तुमच्या डोळ्यांवर त्यांनीं ख्यालीखुशालीचे एवढे जाड पडदे बांधले आहेत, कीं त्यांमधून प्रजेच्या दारिद्र्यावर तुमची दृष्टिच पोंचत नाहीं. असे पाहातां काय? तुम्ही राजे असलांत तरी खरं बोलायला मी भ्यायची नाहीं. कारण मला तुमची कांहींच किंमत वाटत नाहीं.

**राजा**:—राजा या नात्यानं माझी तुम्हांला कांहींच किंमत वाटत नाहीं. मला कःपदार्थ समजतां? मग स्वतःच्या छातीची ढाल करून तुम्ही माझे प्राण कां वांचविलेत?

**जयं०**:—राजनिष्ठेनं प्रेरित होऊन तुमचे प्राण वाचविण्याकरतां मी धांवलें असेन! पण त्याला आणखीही कारणं नव्हतीं असं समजूं नका.

**राजा**:—मग तुम्ही केवळ भूतदयेनंही धांवलां असाल! पण दर्यांत एकादं कुत्रं मांजर बुडत असलं तर त्याला वांचविण्याकरतां तुम्हीं अशीच उडी घ्याल?

**जयं०**:—मी सांगते ना! त्याचं कारण अगदी निराळं आहे.

**राजा**:—हो! पण तेंच मला कळेल का? तुम्ही अशा लाजतां कां? तुमचं माझ्यावर प्रेम का आहे?

**जयं०**:—प्रेम? तुमच्यावर प्रेम? राजावर प्रेम करण्याइतकी मी मूर्ख नाही!

**राजा**:—मग माझा प्राण कां वाचविलांत सांगा?

**जयं०**:—सांगूच?—हो सांगतेंच; नाहीं तर आपला भलताच समज होईल. महाराज, ज्या थोर पुरुषावर मी मनोभावानं प्रेम करतें त्यांची-आंगलट-चेहरा-मोहरा-नजरेची ठेवण—चालण्याची ढब तंतोतंत आपल्याशीं इतकी जुळते, की—

**राजा**:—तोच मी आहें असं तुम्हांला वाटलं?

**जयं०**:—होय महाराज—

**राजा**:—( स्वगत ) जयती, तूं आज मला आनंदसागरांत बुडवून टाकलंस!

**जयं०**:— आपलं रूप, आपले डोळे, आपलं हसणं-बसणं बोलणं-चालणं इतकं राजीवांसारखं आहे, कीं राजीवांचाच खून होतो आहे असं मला त्यावेळी वाटलं! त्यांचं आपलं फक्त बाह्यस्वरूप सारखं आहे—अंतरंग मुळींच नाहीं. त्यांचा मोठेपणा—त्यांचा उदारपणा आपल्यापेक्षां सहस्रपट जास्त आहे! ते गरीब असले, त्यांना जरी राज्य नसलं तरी ते मनानं-कृतीनं खरे राजेच आहेत!

## पद १६—( गझल. )

**जीवाचा राजिव राज। नच राज्य तयाला। ना जरि राज्य तयाला। रूपाचा या जरि भास। नच साम्य गुणांला। ना तरि साम्य मनाला॥ तळपतां चांद गगनांत। चमके काजवा वनांत। वाहिलें बया हृदयास। मी लाजुं कशाला। कां गडे लाजुं तुम्हांला॥ १॥**

**राजा**:— जयंती देवी! बाह्यरूपांत कां होईना, एका सत्पुरुषासारखा मी दिसतों आणि तोही पुरुष कसा तर तुमच्यासारख्या शूर तरुणीनं ज्याला आपलं प्रेम वाहिलं आहे असा! हा माझा दुहेरी बहुमानच झाला आहे असं मी समजतों.

जयंतीदेवी, आपल्या इच्छेप्रमाणं वागण्याचा प्रयत्न करून मी राजा आहें, हें आपल्या अनुभवाला आणीन अशी मला उमेद आहे.

जयं०:—राजांच्या शब्दावर कुणी विश्वास ठेवावा? सृष्टीच्या उत्पत्तीपासून जगांतल्या साऱ्या राजांच्या अंगांत जर सत्याचा संचार असता, त्यांच्या हृदयांत जर न्याय आणि प्रामाणिकपणा वसत असता, तर या पृथ्वीला एव्हांना स्वर्गीय वैभव प्राप्त झालं असतं! एकच पुण्यश्लोक राजा अखिल जगाचा उद्धार करायला समर्थ असतो.

राजा०:—घ्या बोलून. जयंती देवी! जें कांहीं बोलायचं असेल तें बोलून घ्या.

जयं०:—घेतेंच बोलून! न जाणों असा योग पुन्हां येणार नाही! महाराज, पूर्वजन्मींच्या पुण्याईनं राजकुलांत जन्माला येऊन आपण राजा या पदवीला पात्र झालांत, पण प्रजेचं प्रेम संपादन करून तिचा ईश्वरदत्त पिता या नांवाला पात्र झालांत का? ज्या प्रजेच्या जीवांवर तुमचे योगक्षेम चालले आहेत, ती प्रजा अन्नपाण्यावांचून उपाशीं तडफडत आहे, वस्त्रावांचून थंडीनं कुडकुडत आहे, निवाऱ्यावांचून सडकेवर मरते आहे. पण तुम्हीं पंचपक्वान्नांवर ताव मारून मौल्यवान् वस्त्रं अंगांत घालतां आहांत आणि परांच्या किनखापी गादीवर ऐषआराम भोगतां आहांत! या किनखापाच्या गाद्या, गिर्द्या, गालिचे, खिडक्यांचे पडदे या मौल्यवान् विदेशी चिजा आपल्याला काय करायच्या आहेत? इतक्या पैशांत आपल्या राज्यांतील साऱ्या भिकाऱ्यांना पुरेसं अन्नवस्त्र मिळून ते सुखी झाले असते. एवढ्या विदेशी जिनसाकरतां खर्च झालेल्या पैशांत किती तरी दरिद्री देशी कारागिरांच्या कुटुंबांचा तुम्हांला दुवा मिळाला असता! दुष्काळांत सांपडलेल्या किती तरी विणकऱ्यांचे प्राण वांचवल्याचं पुण्य तुमच्या पदरांत पडलं असतं! महाराज, या दिखाऊ डामडौलाचा डोल्हारा ढांसळून टाका! या विदेशी वस्त्रांच्या चिंध्या करा आणि अग्निनारायणाला अर्पण करून त्याचा आशीर्वाद मागा!

राजाः—काय चिंध्या करून जाळून टाकूं? आणि मग ती राख अंगाला फासून फकीर होऊं कीं काय?

जयं०—हो हो, तुमच्यासारख्या राजांनीं देशाकरतां फकिरीच घेतली पाहिजे, वैभवाचा त्याग केला पाहिजे आणि खादीची कफनी घालून प्रजेचं प्रेम संपादलं पाहिजे. मी जर तुमच्या जागीं असतें—माझे राजीव जर राजे असते, तर हा

सगळा महाल खादीनं शृंगारला असता! खादीचे पडदे—खादीच्या गाद्या—खादीचे अभ्रे—सगळी खादीच खादी करून टाकली असती! हा राजवाडा खादीमय केला असता! या राजधानीचं खादीनगर बनवून सोडलं असतं! ते हिऱ्यामोत्याचे अलंकार, तो रत्नजडीत शिरपेंच, तें सोन्याचं सिंहासन रयतेकडून लुटवलं असतं, आणि खादीच्या महालांत खादीचा दरबार भरवला असता!

**राजाः**—( स्वगत ) बोल—बोल—खादीच्या बुलबुला! असाच बोल! तुझ्या सुरेल स्वरांचा असाच अमृतवर्षाव कर.

**जयं०ः**—बरं! प्रजेकडून आपल्याला जो लक्षावधि रुपयांचा कर मिळतो तो तिचं सर्व संकटापासून रक्षण व्हावं म्हणूनच ना? मग आपण विदेशी मालाच्या टोळधाडीपासून तिचं रक्षण कां करीत नाही? महाराज, आपल्याला जर आपल्या रयतेचं कल्याण करायचं असेल, तर आमचं धान्य परदेशी जाऊं देऊं नका आणि हातरहाट, हातमाग इत्यादि हस्तकलांचा प्रसार करून विदेशी मालाच्या व्यापाराचं पुरं उच्चाटण केल्यावांचून राहूं नका.

**राजाः**—जयंती देवी! आपल्या म्हणण्याप्रमाणं करायला मी एका पायावर तयार आहें. पण मी राजा आहें, मला पंक्तिप्रपंच करतां येत नाही, देशी चढाओढीत तटस्थ वृत्ति स्वीकारणंच मला भाग आहे. शिवाय आजच मी जर विदेशी मालाच्या व्यापाऱ्यांना व गिरणीवाल्यांना दुखवलं तर ते आमच्या राज्यांतून निघून जातील आणि सरकारी तिजोरीत तूट येईल.

**जयं०ः**—सरकारी तिजोरीत तूट आली तरी रयतेच्या पोटांत पुरा घांस पडेल! विदेशी मालाचे व्यापारी निघून गेले तर सुंठीवांचून खोकला गेला.

**राजाः**—पण त्यामुळं आमच्या राज्याची सगळी शोभा जाईल. तलम कापड नजरेला पडणार नाही. मोहक जिनसा औषधाला मिळणार नाहींत. जिकडे तिकडे राकट राहणी आणि ओबडधोबड खादी! छेः छेः, नकोच तें.

**जयं०ः**—असल्या आंधळ्या-पांगळ्या-बहिऱ्या राजाची समजूत करणं म्हणजे गाढवापुढं गीता गाण्यासारखंच आहे! महाराज, येतें बरं. आपला प्राण वांचवल्याबद्दल चांगलं बक्षिस दिलंत!

### पद १७—( राग अडाणा )

**सत्ता खरि जनता । जनता । मुदिता सुबत्ता । गांजित मत्ता । जरि कुपित ॥ ध्रु० ॥ चाटि पदतलां सिंहिण झुलतां । क्षणहि चिडवितां वरित क्रूरता । कंठरुधिर करि प्राशन घटघट । प्रलय गर्जता ॥ १ ॥** ( जयंती जाते. )

**राजाः**—अरे, ही रागावून निघून गेली! दयाळ! ( दयाळ येतो. ) जा जा जयंतीदेवींना घरीं पोंचवून या. ( जयंती देवी व दयाळ जातात. ) ( स्वगत ) अहाहा! किती बहारीचा प्रसंग! किती अपूर्वाईचा हा समारंभ! जयंती! तूं केलेल्या स्तुतीच्या सहस्रनामाचा स्वीकार राजीव जितक्या आनंदानं करील तितक्याच आनंदानं तुझ्या शिव्याशापांची लाखोलीही राजा गोड मानून घेईल! आज राजीवावरच्या तुझ्या प्रेमाचा कबुली जबाब राजासमोर होऊन राजाच्या शिक्कामोर्तबानिशी राजीवाच्या अंतःकरणांत नोंदला गेला आहे.

पद १८—( राग शुद्धकल्याण झपताल. )

**ऊलनामनाला झुलवि रतिकांत । चतुरा परी त्या प्रणयीं पडे भ्रांत ॥ ध्रु०॥**
**त्या तप्ततैला जल नेत क्षोभा । दर्यातुफानास स्नेहें मिळे शांति ॥ १ ॥**

( पडदा पडतो. )

[ **अंक २ रा समाप्त.** ]

---

# अंक तिसरा.

## प्रवेश पहिला.

—:०:—

( **स्थळ**—राजवाड्यांतील एक दिवाणखाना. दिवाण व सय्यदअली येतात. )

**दिवाः०**—कोतवाल, बस्स करा तुमची ही मखलाशी! चुकी नाकबूल करून स्वतःची तरफदारी करणं तुमच्या दर्जाच्या पोलीस अधिकाऱ्याला शोभत नाहीं.

**सय्यः०**—पण अगोदर माझी चुकी काय झाली तें तर सांगा. उगीच 'साप-साप' म्हणून दोरखंड बडवण्यांत काय अर्थ आहे?

**दिवाः०**—चुकी म्हणजे तुमच्या बंदोबस्ताची ढिलाई! प्रत्यक्ष महाराजांच्य प्राणांवर हल्ला! हा काय बंदोबस्त?

**सय्यः०**—पण महाराजांवर हल्ला होण्याइतके लोक तरी महाराजांवर नाराज कां व्हावेत? बोला याबद्दल जबाबदार कोण? राज्याचा गाडा हांकणारे कारभारीच नव्हेत का? प्रजा असंतुष्ट व्हायला कारण कोण? कारभारी कां पोलीस? कारभाऱ्यांनीं केलेलीं पापं पोलीसांनीं निस्तरायचीं हा कुठला न्याय?

दिवाः०—बरंबरं. महाराज नावाजतात म्हणून इतके चढून जाऊं नका. मी दिवाण आहें. कारभारांत काळ्याचे पांढरे केस झाले, तरी अजून फट म्हणून घेतलं नाहीं. मोठमोठ्यांनीं जो कित्ता घालून दिला आहे, तोच मी गिरवतों आहें. पण तुम्ही ! रयतेला धाकांत ठेवतां येत नाहीं, ही काय पोलीसांची लायकी ?

( राजा व दयाळ येतात. )

राजाः—राजाच्या जिवाचं रक्षण करतां येत नाहीं, ही काय एडीसीची लायकी ?–कोण दिवाणसाहेब ! तुम्हीं भाकांत केलं तसं शेवटीं झालं ! आजपासून उद्योगधंदा आणि व्यापारी खात्याचा कारभार आपल्याकडे.

दिवाः०—कां सरकारांना अनुभव आला ?

राजाः—पुरा अनुभव आला. जिवाचं मोल देऊन अनुभव घेतला !

दिवाः०—मी प्रथमच नाहीं सांगितलं, लोक शेफारून जातील म्हणून ?

राजाः—हो तर. गुलामांनी माझ्याच प्राणांवर गदा आणली की हो ! छेः छेः छेः ! आपल्यासारख्या वयोवृद्ध तपोवृद्ध अनुभवी मुत्सद्याचा सल्ला ऐकला नाहीं, केवढी चुकी केली !

दिवाः०—महाराजांनाच कळून आलं, ठीक झालं. तरी म्हटलं, माझे अडाखे चुकायचे नाहीत. कारभारांत काळ्याचे पांढरे झाले ते उगीच नाहींत.

राजाः—आतां तो कारभार—त्या व्यापारी घडामोडी–ते उद्योगधंदे नको नको नको, त्यांचा संपर्क सुद्धां नको. काय लोक हरामखोर हो ! मी त्याचा पक्षपाती आणि माझ्यावरच हल्ला ! आणि हे आमचे एडीसी–शरीरसंरक्षक ! काय आमचं रक्षण केलं ?

दिवाः०—आणि हे सर कोतवाल ! काय बंदोबस्त ठेवला !

राजाः—मारेकऱ्याची कट्यार आमच्या उरावर आणि हे झोपा काढताहेत ! म्हणे ए. डी. सी. ! फुकटच नाही एडीसी व्हायचं !

दया०—सरकार ! कसूर झाली माफी असावी–( हुजऱ्या येतो. )

हुजु०ः—शेट केशरचंद आणि दिवाकर साहेब आले आहेत.

राजाः—येऊं द्या त्यांना आंत. ( हुजऱ्या जातो ) दिवाणसाहेब, त्या विदेशी मालाच्या व्यापाऱ्यांना मी नाहक नाराज केलं, नाही ? आज त्याचा राग मला काढून टाकला पाहिजे. ( केशरचंद, दिवाकर आणि चूचाँग, हारतुरे वगैरे घेऊन येतात. )

केश०:—षरकार साहेबांणा शुकरूप पाहूण षमाधाण झालं. राजद्रोही मारेकऱ्यांच्या हातून षरकारचा जीव बचावला, ये बावत आम्ही षरकारचा शुभचिंतन करते. ( हारतुरे पानसुपारी देतो. दिवाकरही हार घालतो. )

चूचाँ०:—मीनी पन राजेसाबांचा खून न्ना झाला, म्हून आनंद कंतो.

दिवा०:—महाराजांची पूर्वपुण्याईच जबर म्हणून परमेश्वरानं त्यांचं रक्षण केलं! काय ती मुलगी तरी! काय तिचं नांव जयंती!-हो जयंती! जबर छातीची बायको! कशी केव्हां महाराजांजवळ गेली-डोळयाचं पातं लवतं न लवतं तों तिनं उडी घातली—

केश०:—आणि महाराजावर जंबीया रोखला नही? काय बायका लोक बेफाम झाल्या! राजद्रोही! खुनी! सुशिक्षीत!

राजा:—केशरचंद, हें काय तुम्हीं भलतंच बोलतां आहां? मारेकरी माझ्यावर धांवून येतांच, जयंतीदेवीनं मर्दाप्रमाणं मध्यें येऊन बरचीचा वार आपल्या उरावर घेतला, म्हणून तर आज मी तुम्हाला जिवंत दिसतों आहें. नाही तर त्याच वेळीं माझ्या प्राणांनीं परलोकीं प्रयाण केलं असतं!

केश०:—अषं झालं नै? आमी तो आषा ऐकला—

राजा:—पण तुम्ही प्रत्यक्ष काय पाहिलंत? तुम्ही स्वतः त्यावेळीं तिथं होतां ना?

केश:०—हो हो होतो तर! नै कषा म्हणवा? पण—

दिवा:०—सरकार, त्यावेळीं साऱ्या गोष्टी इतक्या चटदिशी झाल्या, कीं, काय झालं आणि काय नाहीं, हें सुद्धां कुणाला कळलं नाहीं. शेटजींसारखाच पुष्कळ लोकांचा समज आहे?

राजा:—काय समज आहे?

दिवा:०—कीं त्या जयंतीनंच प्रथम महाराजांवर उडी घेतली आणि हातांतील बरचीनं ती त्यांचा खून करणार, तोंच तो खुनी म्हणून पकडलेला इसम धांवला आणि त्यानं जयंतीच्या हातांतली बरची हिसकावून घेतली.

राजा:—( आश्चर्यानं ) असं नाही? आणि मग जयंतीला जखम कशी झाली?

दिवा:०—त्या हिसकाहिसकीत तिच्या छातीला थोडी दुखापत झाली इतकंच!

चूचाँ:०—थोंदी दुंकापत झाली इंतकंच!

राजाः—( खोटा आव आणून ) तुमचं म्हणणंही जरा विचार करण्या-सारखं आहे.

केशः०—षमदा लोक बोलते, आमी स्वतः अषा अशा पाहिला. तो बिचारा साधु पुरुष–

चुचाँः०—किती पन सांदू ? अंगदी खरा सादु.

राजाः—कोण ?

केशः०—तो पकडलेला माणूस! तो होता म्हणून हा संकट निभावला. पग चोर शुदून षंन्यासी पकडला जायचा तशाच झाला ?

राजाः— हो तसंही व्हायचा संभव आहे नाहीं कोतवाल ?

सय्यः०—सरकार, बोलतो याची माफी असावी. जयंतीदेवीबद्दलची ही गोष्ट अगदीं बनावट आहे. मीं स्वतः त्या खुनी माणसाला पकडलं आहे. त्याला बरची उगारून महाराजांवर धावतांना मीं या डोळ्यांनीं पाहिला. पण माझ्या आधींच जयंती देवी धावल्या आणि वार करतां करतां मी त्या खुनी माणसाला पकडलं. या दयाळांनाच विचारा.

दयाः०—सय्यदअल्लींचंच म्हणणं खरं आहे. त्या खुनी इसमाला निर्दोषी म्हणून सोडून जंयतीदेवीवर आरोप करणें म्हणजे मात्र चोर सोडून संन्याशाला शिक्षा करण्यासारखं आहे खरं.

चूचाँ ०—मिनी सांगते. जंतीनं खून केंला. अंचा अंचा केंला. एंदीसी व्हते.

राजाः—बरं तें जाऊं द्या. माझ्यासमोरच सगळा प्रकार घडला पण मला कांहीं कळलंच नाहीं. केशरचंद, आम्ही जयंतीलाही पकडीत नाहीं आणि त्या खुनी माणसालाही तूर्त सोडून देत नाहीं. पण मीं असं ऐकलं आहे, कीं राजीव म्हणून जो या चळवळ्यांचा एक पुढारी आहे, त्यानं माझा खून करण्या-करतां त्या मारेकऱ्याची योजना केली होती. त्या खुनी इसमानंही अशीच जबानी दिली आहे म्हणून सय्यदअल्ली म्हणत होते. म्हणून म्हणतों केशरचंद, तुमची ही कथा जरा कल्पित—

केशः०:—ते तषा बी असेल–तषा बी असेल! तो राजीवचा कट तो खराच!

दिवाः०:—पण ह्या गोष्टीची सध्या वाटाघाट कशाला ? गुन्हेगारांची न्यायासना-समोर चौकशी होईलच. महाराजांनीं उगीच चिंता करण्याचं कारण नाहीं.

राजाः—दिवाण साहेब, चिंता करण्याचं कारण एवढंच, कीं तो राजीव मोठा कारस्थानी दिसतो. त्याचा चेहरा हुबेहुब माझ्यासारखाच आहे म्हणतात. तेव्हां मला गपचीप मारून टाकून, आपणच राजा म्हणून माझं राज्य बळकावून बसायचा !

चूचां०:—गंपाचिंप खून करायचा आनि तो रांजा व्हानचा ?

सभ्य०:—सरकार ती भीति मुळीच नको. राजीवाच्या प्रत्येक हालचालीवर पोलीसची नजर आहे.

दिवा०:—त्याचा चेहरा इतका हुजुरस्वारीसारखा आहे ? केशरचंद, आपण पाहिलं आहे का त्याला ?

केश०:—हो आमी पायलाय त्याला ! आमी षांगते षारका हेबी अन नैबी. त्याला तुमी पायेल तर सहज बळकेळ की तो एक पाजी बदमाष हलकट माणूस है. मी तर त्याच्या चेहऱ्यावर थुंकनार बा नै.

दिवा०:—मी तर म्हणतों, कीं त्याचा चेहरा सरकारांच्या चेहऱ्याशी चांगलाच जमतो. बाकी त्याचं डोकं पाहाल तर तें शहाण्या माणसाचं डोकं आहे असं कुणीही म्हणणार नाही. निर्बुद्ध बेअकलीपणाचं ते एक प्रदर्शनच दिसतं ! तसेच डोळे ! गुलामाच्या डोळ्यांत चमक कशी ती नाहींच. अष्टौप्रहर दारूबाजासारखे तारवटलेले ! त्याचं नाक म्हणजे घ्राणेंद्रिय नव्हेच तें मुळीं ! एका बेढब टेकडीच्या दरडी कोसळून झालेलीं दोन खिंडारं दिसतात ! स्वारीचे कान तर काय ! एका फर्लांगावरून सहज पकडतां येतील इतके लांब—म्हणजे जातिवंत लंबकर्णी आहेत !

राजाः—वाः दिवाकर, आपण अगदी आरशांत पाहून बोलल्यासारखं बोलता आहां ! एकूण तुमच्या मतानं तो अगदी माझ्यासारखा आहे होय ना ? म्हणूनच म्हणतों, असला मनुष्य मोकळा सोडून उपयोगी नाही. त्याला शिक्षा ही झालीच पाहिजे. प्रथम वारंट काढा दिवाणसाहेब त्याला.

दिवा०:—त्याला पकडून खटला लवकरच चालू होईल. आपले सर न्यायाधीश तसेच न्यायी आहेत. ते त्याला शिक्षा देतीलच.

राजाः—पण दिवाणसाहेब, तो राजीव होम इंडस्ट्रीजवाल्यांचा पुढारी आहे. तेव्हा आपल्या सर न्यायाधिशांनी कसाही निःपक्षपाती निकाल दिला तरी लोक त्याला अन्यायच म्हणतील. म्हणून म्हणतों, या खटल्याकरता म्हणून मुद्दाम

रयतेपैकींच एखादा स्वतंत्र बाण्याचा आणि लोकांच्या विश्वासाला पात्र असा आणखी एक न्यायाधीश नेमून तो आपल्या सर न्यायाधिशांच्या जोडीला बसवावा, आणि दोघांनीं मिळून खटल्याचा निकाल द्यावा.

**दिवा०:**—सरकारांची इच्छा अगदीं योग्य आहे.

**राजा:**—पण तसा निःपक्षपाती गृहस्थ–दिवाकरसाहेब, आपली नेमणूक त्या जागेवर झाली तर —

**दिवा०:**—नको नको सरकार! हे खादीवाले अराजक माझा खून करतील दिवसाढवळ्या. मी इतका अप्रिय आहें लोकांना, की कांहीं विचारूं नका.

**राजा:**—असं! मला वाटलं आपली लोकांत फारच चहा असेल! मग शेट केशरचद आपणच ही न्यायाधीशाची जागा पत्करावी हें बरं. आपण तिला योग्य आहांत.

**केश०:** —हा तषा है. पण दिवाकर शेटषारखाच लोक माजा राग करतात. तवां माजा खून जरी नै केला तरी माजा बंगला–माझी कापडाची दुकानं, माज्या हिऱ्यामोत्यांच्या वखारी, षमदी जिनगी जाळून फस्त करतील हे खादीवाले. मलाबी भाजून टाकतील. माजा भारी भारी नुकषान करतील. मी नैच उपयोगी.

**राजा:**—मग कोण नेमावा? चूचाँग—

**चूचाँ०:**—हाहा मींनी पन तयार हां. मांजा कांदा जतो. रांजीव चिंक्चा देन. चांगा फाची देन. फंतके मारीन. तुमीनी मोंता जंज व्हंतो. चिन्नी जंज व्हंतो. चिंक्चा कंतो.

**दिवा:**—छे छे सरकार, हे चूचाँग नाहींत उपयोगी. अगोदर हे चिनी. त्यांना इकडचं कांहींच समजत नाही. शिवाय ते मनुष्य का आहेत? श्रीमंत आहेत म्हणून शेटजीच्या भागीत आहेत झालं.

**केश०:**—मी म्हणते, षरकारशाहेब, आमचा विश्राम हैना? तो भारी भारी चांगला माणश है.

**चूचाँ**—अन्नी मी चांगला ना?

**केश०:**—विश्राम चांगला एल् एल् बी है, शांत है, मोठा शंभावित माणस है. शिवाय तो बाबासाहेब देशमुखाचा मुलगा है. ते लोकभी चांगला म्हणते त्याला.

**राजा:**—मग तो कमला नीट न्याय देतो? ते लोक भीड घालतील, आणि राजीवाला तो निर्दोषी म्हणून सोडूनही देतील.

चूचाँ०:—तो सोंदून देईल. मीनी चिक्वा देन. विंचाराम सोंदून देईल.

केश०:—नै नै तषा कषा करील ? तो चांगला है. तेलाच नेमावा.

राजा:—इतकी तुम्ही शिफारस करतां त्यांची ? काय सय्यदअल्ली, विश्रामांना खास न्यायाधीश नेमलं तर चालेल का ?

सय्य०:—हुजूरनीं बेलाशक त्यांची नेमणूक करावी. त्यांच्याविरुद्ध लोक मुळींच गवगवा करणार नाहींत. स्वतंत्र मताचा मनुष्य म्हणून लोक त्यांना मान देतात.

दिवा०:—सरकार, विश्रामाचीच नेमणूक आपण करूंया.

चूचाँ०:—अन्नी मिनी नंको ?

केश०:—चूचाँग, गप बैष.

दिवा०:—महाराजांची ही रयतेपैकीच खास न्यायाधिशाची कल्पना आणि विश्रामांची निवड लोकांना चांगलीच पसंत पडेल, माझी खात्री आहे.

राजा:—मग आतांच्या आतां विश्रामांना तसा हुकूम लिहा, आणि राजीव व इतर गुन्हेगारांना वारंट काढून खटला लवकर चालूं होऊं द्या. जा दिवाणसाहेब, लौकर कामाला लागा. शेटसाहेब, आपल्याला आणि दिवाकर साहेबांना रजा आहे आतां. ( दिवाण जातो. )

केश०:—आमी येतो तर.

दिवा०:—मीही रजा घेतों. ( जातां जातां ) केशरचंद, जयंतीचं साधलं नाहीं. न साधूंद्या. पण विश्रामाच्या हातून राजीवाचा विचू आतां मारवला पाहिजे. ( केशरचंद दिवाकर व चूचाँग जातात )

दया०:—( स्वगत ) आजपर्यंत पुष्कळ नट आणि नाटकं पाहिलीं असतील पण आमच्या महाराजासारखा नट आणि त्यांच्या या नाटकासारखं नाटक कुणाचि पाहिलं नसेल.

राजा:—सय्यदअल्ली, दिवाणसाहेबांनीं राजीवावर वारंट काढलं असेल. तें बजावण्याकरतां कडीतोड्यासह लश्कर द्या. आम्ही तयार आहों राजीवाच्या वेषांत चतुर्भुज व्हायला.

(पद १९—राग बहार ताल एका. )

**उचित बहु वधुलाभा वरसाज हा ॥ ध्रु० ॥ हृदया गुंगवि । ती उदिता जनता । रंग तुरुंगीं पाहुं या ॥ १ ॥**

दया०—आतां हें नाटक रंगणार खरं. चला सय्यदअल्ली. ( जातात )

## प्रवेश २ रा.

——:०:——

[ स्थळः—बाबासाहेबांच्या घराची ओटी पुष्कर येतो.. ]

**पुष्कः०**—( स्वगत ) आय ॲम दि मॉनर्क ऑफ् ऑल् आय् सर्व्हे!" ( तीन चार वेळा इकडून तिकडे फिरत वरील वाक्य म्हणता.) आज आम्ही राजे आहोंत या इथं! पण कां? घरचा सगळा राज्यकारभार आमच्यावर सोंपवून बाबासाहेब वगैरे मंडळी राजीवांच्या खटल्याचा निकाल ऐकण्याकरितां कोर्टांत गेली म्हणून! आपणही जावं असं मनांत येतं! पण जाऊन तरी काय करायचंय! माहीत आहे तेंच ऐकायचं! राजीवांना शिक्षा होणार! ठरलेलंच आहे हें! होणारच! मग आमचे दादासाहेब जरी स्पेशल न्यायाधीश असले तरी मी तिथं जाऊन त्या न्यायाधीशाचा कान धरून निराळा निकाल थोडाच वदवणार आहें! इथलं राज्य मात्र आपलं आज! आय् ॲम दि मॉनर्क् ऑफ् ऑल् ऑय सर्व्हे? माय् राईट् देअर इज् नन टू डिस्प्यूट्! ( चूचाँग येतो. ) आमच्या अधिकाराबद्दल बिलकुल प्रश्न नसतांना हे चूचाँग कसे आले आमच्या राज्यांत?

**चूचां:०**—एं पोरां चांता हो इंतून—

**पुष्कः०**—चालतां होऊं? म्हणजे? मला कोण तुम्हीं चालता हो म्हणून सांगणारे या घरांत?

**चूचाँ०:**—निंगून जा इंतून नातर त्रेसपांसचा खंतला करीन.

**पुष्कः०**—ट्रेसपासचा खटला! माझ्यावर? वाः! एखाद्याच्या घरांत शिरून घरच्या मालकांवरच ट्रेसपासचा खटला? अहो चूचाँग घर आमचं आहे. तुम्ही बाहेर जा इथून!

**चूचाँ:०**—( एका खुर्चीवर बसून ) मी ना अंकायचा! मांज पजेशन हं. मी नाघर द्यांचा.

**पुष्कः०**—घरांत पाऊल ठेवलं नाहीं तोंच धनी झाले कीं घराचे! दुसऱ्याच्या घरांत सोवळं भांडं टाकून माझा ताबा आहे म्हणण्याची राजापासून रंका पर्यंत रीतच आहे. अहो चूचाँग, मला पोर समजून या कायद्याच्या गोष्टी सांगतां वाटतं? पण मी चोर नाहीं समजलांत? मालकाच्या मागं पोराबाळांना गुंगवून कायद्याच्या आणि पझेशनच्या गोष्टी सांगणारा चोर तूं. चल हो घराच्या बाहेर.

चूचाँ०:—ना बाइर व्हंत. कांतीनं मारशील?

पुष्क०—अरे मारायचं असतं तर केव्हांच मी तुझं टाळक. फोडलं असतं; पण अनत्याचारी पडलों, मारूं कसा ?

चूचाँ०:—मग कां करशील ? मीं कांतीन मारीन तुंला. तुंला कां करशील ? निंग इंतून ?

पुष्क०:— स्वगत ) घरीं आज माझं राज्य आणि माय राईट देअर इज नन् टु डिस्प्युट. म्हणून मोठा आनंदांत होतों ! पण हे चिनई माकड मारुती सारखं पुच्छासन करून बसलं आमच्या रावण महाराजांसमोर. याचं पुच्छ आतां कस हस्तगत करावं ?

चूचाँ०:—अंता मुंका कां ? नीग इंथून.

पुष्क०:—बाबांना येऊं द्या ! म्हणजे सांगतों तुम्हांला ! ते कोर्टांत राजावाच्या खटल्याची—

चूचा०:—निंकाल झाला ! राजीवांचा निंकाल झाला ! तीन वर्षांची चिकचा झाली ! निग इथून. नातर विंदी ओंदायची हान. कांदी आन्न.

पुष्क०:—( कांड्याची पेटी देऊन ) ही घ्या पेटी—लावा आग तोंडाला. ( चूचाँग विडी पेटवीपर्यंत चूचाँगची वेणी खुर्चीच्या पाठीला बांधतो. ) पेंतला विंदं ? ( समोर येऊन उभा राहातो. )

चूचाँ०:—थंता कंनतो पोंत्ता ?

पुष्क०:—छेः छेः मुळींच थट्टा नाहीं ! चूचाँग ? तुम्ही चिनी किती सुंदर दिसतां हो ! तुमचं हें डोकं नासके बटाटे भरलेला जसा कांही गोडाऊनच ! हे दोन बारीक डोळे—त्या गोडाऊनमध्यें मिण मिण करणाऱ्या दोन पणत्या ! या नाकपुड्या—उंदराच्या उकीरांतलीं दोन बिळंच जणूं ? त्या बारीक मिशा—आताच त्या बिळांतून बाहेर पडलेल्या घोणी ! तें तोंड—म्युनिसीपालटीच्या बत्तीस मोऱ्याची रांगच ! ती लांब वेणी—अरेच्या, बरोबर माकडाचं शेपूट ! माकड माकड हुप ! हुप ! ( उड्या मारतो व नाक खाजवतो. )

चूचाँ०: तुन्ना अंता मानतो. ( उठून मारायला धावतो; वेणीला बांधलेली खुर्ची मागे लोंबकळते. पुष्कर खोलींत शिरतो. चूचाँग खुर्चीसुद्धां आंत शिरतो. पुष्कर पटकन बाहेर येतो. व दाराला कडी लावून घेतो. )

पुष्क०:—माकड माकड हुप !

चूचाँ०:—( आंतून ) दरवाजा उंगड!

पुष्क०:—( वेडावून ) मिन्ना, तुंजा पॅजेशन हा. घर तुंज हा. खुर्चीवर बसा मि निंगतो ईतून.

चूचाँ:—( आंतून ) नको, नको, मन्ना भांड्र कांद. मी जांतो ईथून. गुंद मोंदलींग कतो. पया पंदतो.

पुष्क:०—नको–नको–मी–जंतो इंथून. काय चूचाँग! कसं काय? ट्रेस-पासचा खटला केव्हां करतां?

चूचाँ:०—( आंतून ) चुंकी झालं. खंतला ना कंते. दरवंजा उंगड. पांच रुपये देंतो.

पुष्क:०—नंको! कां आतां जिरली कां खैरी? हें पहा पांच रुपये रुपये नकोत मला. एक करतां का?

चूचाँ.०—वांतेल ते कंतो ( आंतून )

पुष्क०:—वाटेल तें करतां? ठीक–ठीक–! हें पहा, तुमचे कपडे काढून ठेवा आंत आणि खुंटीवर खादीचा सद्रा, टोपी, धोतर–सगळे कपडे आहेत ते अंगांत घालून तयार व्हा; म्हणजे मी तुम्हांला काढतो बाहेर. आहे कबूल?

चूचाँ०:—कबूल–खांदी कंपदे कंतो.

पुष्क०:—करा! अरेच्या! बाबा आले वाटतं! हें पहा चूचाँग! गपचीप कपडे करा. बाबा येतात! बोलूं नका. ते मारतील तुम्हांला गोळी घालून. बोलूं नका, गप बसा. बाबा आंत गेले कीं मी तुम्हाला बाहेर काढीन. गप्प! आले हो आले! ( स्वगत ) अरे बापरे! खरोखरीच आले! आपण पळावं आतां इथून ( बाबासाहेब व नंदिनी येतात. )

बाबा०:—नंदिनी! आतां तर तुझी खात्री झाली ना? राजीवांनीं डिफेन्स दिला नाहीं. तरी ते निरपराधी आहेत, अशी तुझी खात्री असल्यामुळं तूं अप्रण होऊन त्यांच्यातर्फे साक्ष द्यायला गेलीस, आणि तुझ्या समजुतीप्रमाणं तूं अगदीं ईश्वराला स्मरून साक्ष दिलीस. पण न्यायाधिशानं म्हणजे विश्रामानं त्याचं काय चीज केलं? अग, असल्या खटल्यांत न्याय होणार कसा? बोलून चालून विदेशी मालाच्या व्यापाऱ्यांच्या हातांतील बाहुलं एक न्यायाधीश!

**नंदि०:**—बाबासाहेब ! राजीवांनीं तरी पुरावा द्यायचा कां नाकारावा ? चांगली केस भांडायची होती. माझी साक्ष होतीच. चिंध्या उडाल्या असत्या फिर्यादीच्या पुराव्याच्या !

**बाबा०:**—हा तुझा भ्रमाचा भोपळा केव्हां फुटेल तो सुदिन !

**नंदि०:**—बाबासाहेब ! असेल, माझा भ्रम असेल. पण माझ्या मनोदेवतेला वाटतं तें मीं कां बोलूं नये ? पण खरोखर आज मीसुद्धां आश्चर्यानं थक्क झालें आहें. पुन्हां पुन्हां विचार करतें, पण अजून प्रकाश पडत नाही असं कां व्हावं ? राजीवांना शिक्षा कां व्हावी ?

**बाबा०:**—कर, असाच–हाच विचार कर. माझा मात्र विचार ठरला. हें अंगिकृत कार्य हा यज्ञ शेवटाला नेल्याशिवाय रहायचं नाही. खटले करोत, कैदेंत ठेवोत, किंवा काळ्या पाण्यावर पाठवोत; मागं पाऊल घ्यायचं नाहीं. मी, जयंती, प्रयाग व माझे गांवकरी इतकी प्रखर चळवळ करूं कीं, तीन वर्षें काय, तीन दिवसांतच राजीवांना सोडून देणं सरकारांना भाग पडेल. बघ ! माझी वाणी कधीहीं खोटी व्हावयाची नाहीं.

पद २०—राग मेघ मल्हार त्रिताल. )

**तप दारुण या कार्या । देइल दिव्य तेज । जागृति शाश्वत ॥ ध्रु० ॥**
**चळवळिच्या ज्वाळा झळकत । स्वाभिमान दिग्मंडळ व्यापित ।**
**मातृभूमिरव हृदय गांजिता । यागसांगता करिल नृपति ॥ १ ॥**

( बाबा साहेब जातो.)

**नंदि०:**—( स्वगत ) बाबासाहेबांच्या भाषणानं माझं रक्त कां बरं सळसळतं ? माझ्या अंगावर रोमांच कां बरं उभे राहिले ? अंतःकरणांत झोप घेत पडलेली कोणती दिव्य शक्ति आज जागृत झाली ? ( विश्राम येतो. )

**विश्रा०:**—कोण नंदिनी ! बरी भेटलीस.

**नंदि०:**—माझ्याशीं बोलायचं असेल तर अगोदर नोकरीचा राजीनामा लिहा आणि मग बोला. मीं स्वयंस्फूर्तीनें दिलेल्या साक्षीची सन्माननीय न्यायाधीश, महाराज, आपण काय किंमत केलीत ? अगांतुकी इतकी तरी शेवटीं राजीवांना शिक्षा दिलीतच ना ? लोकांच्या पुढाऱ्यांत आणि एकाद्या बंडखोर पुंडांत काय फरक केलात ?

**विश्रा०:**—कां बरं ? राजीव कोर्टांत येतांच उत्थापन देऊन त्यांचा सन्मान नाहीं कां केला ? बसायला खुर्ची नाही कां दिली ? विद्वत्तेची प्रशंसा नाहीं का

केली ? सहानुभूतीचे उद्गार नाहीं कां काढले ? स्वदेशाभिमानाबद्दल गौरव नाहीं का केला ? तसं आम्हीं कांहींच केलं नाहीं असं नाहीं.

नंदि०:—सगळं केलंत पण जें करायला हवं होतं तेवढंच केलं नाहींत. गोड गोड बोलून गळा कापण्याचं मुळीं व्रतच चाललं आहे सगळीकडे !

विश्रा०:—चाललं आहे तर चालूं दे. तुला काय करायचं आहे त्याच्याशीं ?

नंदि०:—काय करायचं आहे म्हणजे ? मला सगळं करायचं आहे.

विश्रा०:—सत्याग्रह करायचा आहे वाटतं ?

नंदि०:—हो—हो. सत्याग्रह करायचा आहे ! खादी वापरायची आहे ! रहाट फिरवायचा आहे ! मागावर विणायचं आहे ! जयंतीताई जें जें करते तें सारं करायचं आहे.

विश्रा०:—पण तुझीं पूर्वीची मतं ?

नंदि०:—बदललीं—पार बदललीं—वेड्या मतांना—आंधळ्या सुधारणांना, खोट्या वैभवाला आणि लटक्या मनाला जर मी कवटाळीत बसलें तर सुशिक्षिणाचा आणि बी. ए. च्या डिग्रीचा उपयोग काय ? त्या मॅनेजरशीपचा आतांच्या आतां राजीनामा पाठवलात तर ठीक, नाहीं तर—

विश्रा०:—नाहीं तर काय ? आपलं लग्न—

नंदि०:—लग्न ? या चळवळीबरोबर ! लग्न मानानं करावं, अपमानानं करूं नये. ( नंदिनी जाते. )

विश्रा०:—( स्वगत ) अरेरे ! हें काय झालं ? मी खालीं खालीं खोल खोल कुठं जात आहें ? प्रेमाच्या शैलशिखराचा खंदक झाला ! प्रणयाच्या कड्यावरून माझा कडेलोट झाला ! प्रेमाचे–अमृताचे कलश फुटून गेले ! नरकाच्या न्हाणींत मीं उडी घेतली ! गेलों–गेलों रसातळाला गेलों ! माझं मस्तक फुटून चाललं ! एकांत–एकांत–कुठं तरी एकांतात पडूं द्या. ( खोलीचें दार उघडते. चूचाँग खादीचा पोषाख घातलेला येतो. ) हे कोण ?

चूचाँ०:—चूचाँग ! मिन्स्तर चूचाँग ! विश्राम, गुंदमोंदलिंग. मी मुद्दाम खादी घांतली. कसा दिसतो ?

विश्रा०:—तुमच्याशीं बोलण्यासारखी माझी मनःस्थिति नाहीं. तुम्हीं जा आतां. ( विश्राम खोलींत जाऊन दार लावून घेतो. )

चूचॉ०:—हां गेला. मांजा चिनी ड्रेस आंत हा. असूंदे. खांदीच घालून जंतो. त्या पोंत्याची खोंद मोनतो. चोरीचा खंतला कंतो. अफूंचा आळ घांतो. मना वाटेल तें कंतो. अशं हाच आंत. पोलिस घेऊन येंतो. तो पोंता काय समजला हा.

( जातो. )

## प्रवेश तिसरा.

( **स्थळ**—राजा ( राजीव ) कैद्याच्या पोशाखांत. )

**राजाः**—राजकैदी ! राजा हाच खरा राजकैदी आहे ! जगाच्या जगड्व्याळ कैदखान्यांत जितके म्हणून कैदी आहेत, त्यांत राजासारखा करंटा कैदी कोणीही नसेल ! सिंहासनांवर पाऊल ठेवतांक्षणींच बंदीवासाचे सारे संस्कार बिचाऱ्याच्या वांट्याला येतात ! दरबारी रिवाजांच्या अवजड बेड्या आणि परंपरागत रूढींचा राक्षसी खोडा त्याचे हातपाय जखडून टाकतात ! त्याच्या क्षुल्लक हालचालीवरदेखील बंडखोर कैद्यापेक्षांही जास्त करडी नजर ! त्यानं असंच केलं तसंच केलं; असाच चालला तसाच उभा राहिला ! त्यानं असाच हात केला तशीच नजर फिरवली ! अशा तऱ्हेच्या टिकेचा त्याच्यावर भडीमार ! दिवसभर मुलाखतीच्या सक्त मजुरीनं बिचाऱ्याचा जीव बेजार झाला तरी जरा कुठं आडवं व्हायची किंवा मानसिक यातना विस्मृतीत बुडवून टाकाव्या म्हणून थोडी डुलकी काडायची ही चोरी ! राजाची कुणाला दया तर येत नाहींच, पण राज्यांत एखादी क्षुल्लक गोष्ट का घडेना तिचं खापर राजाच्या माथ्यावर ! स्वातंत्र्य ! किती गोड शब्द आहे ! नुसतं स्वातंत्र्य म्हणतांच लोक नाचायला लागतात. पण राजाच्या वांट्याला स्वातंत्र्याचा लवलेश तरी ! स्वातंत्र्याकरतां राजानं लढायचं पण तें देशाला स्वातंत्र्य मिळण्याकरितां ! स्वतः स्वतंत्र होण्याकरतां नव्हे. राजा खरा परतंत्र—खरा कैदी ! आणि या कैदखान्यांतून त्याची मुक्तता करणारा मृत्युच ! ( सय्यद अल्ली येतो, त्यास लवून मुजरा करून ) बंदगी साहेब !

**सय्य०:**—हें-हें काय सरकार ?

**राजाः**—काय म्हणजे ? मी कैदी आणि तुम्ही कैद्यावरचे अधिकारी. कैद्याची शिस्त मला पाळलीच पाहिजे. कैद्यानं अधिकाऱ्याला असा लवून मुजरा केलाच पाहिजे. ( पुनः मुजरा करतो. )



**जयंती**—राजीव, मी आपल्याला भेटायला आलें आहें. (पान ५७)

मनोरंजन प्रेस, मुंबई ४.

**सय्य०:**—( एकदम पायां पडून ) त्यापेक्षां माझा जीव कां घेत नाहीं आपण ? महाराज, या नोकरीचा आज राजीनामा घ्यावा. काल चूचाँगनं बाबासाहेबांच्या इथं केलेला प्रकार आपण ऐकलाच आहे. आज पुष्करावर अफू आणि कपडे चोरीचा खटला चालून त्याला एक दिवसाची कैद आणि शंभर फटक्यांची शिक्षा झाली आहे.

**राजाः**—काय ! पुष्कराला फटक्यांची शिक्षा ? फटके मारले ?

**सय्य०:**—छेः, त्याला आज नुसतं कैदेंत ठेवलं आहे. सरकारांचा काय हुकूम आहे ?

**राजाः**—पुष्कराला आज मजेंत कैदेची हवा खाऊं द्या. उद्यां फटके न खातां तो सुटेलच. ( बाराचे तास वाजतात. )

**सय्य०:**—जयंतीदेवी आपल्या भेटीला येत आहेत. त्या बाहेर आल्याही असतील. मी पाहून येतों. ( सय्यद अल्ली जातो. )

**राजाः**—( स्वगत ) जयंतीच्या भेटीचा हा प्रसंग म्हणजे प्रणयाच्या साखर-पुड्याचा समारंभच आहे. राजीवावर आपलं प्राणांपलीकडे प्रेम आहे, असा राजापुढं दिलेला कबुलीजबाब आज हा राजीव जयंतीच्या गोंडस मुखांतून पुनः वदवणार !—देशकार्याकरतां प्रेमाला तिलांजली द्यावी असं कोणी म्हणोत, पण जयंतीच्या प्रेमामुळं तर देशकार्याला जास्त जास्त कवटाळायला मला उत्तेजन मिळालं ! ज्या प्रेमाच्या बळावर जगाची उलथापालथ करतां येते, त्या प्रेमाला लाथाडून देणं, त्याचा चुरडून चोळामोळा करणं, त्याची रक्षा अंगाला फासून प्रेमाची कायमची फारकत करून घेणं, प्रणयी कृतज्ञतेला कितपत रुचेल ?

( **पद २१**—राग मालकंस झपताल. )

**कालतमिं घेत उडि । त्यागितां जो प्रभा । रविराज मलिनतेज । पात्र ना पूजना ॥ धृ० ॥ येतां प्रलयकाल । प्रेमें प्रियतमा । प्रेमरस प्याला । देई प्रियाला ॥ १ ॥**

( जयंती येते. )

**जयं०:**—द्वारमंडळाकरतां कैदखान्याचं जिणं पत्करणाऱ्या वीराचा विजय असो.

**राजा०:**—( स्वगत ) पाहूं आतां खोट्या रागाचा खरा आविर्भाव कसा साधतो तो !

**जयं०:**—राजीव, मी आपल्याला भेटायला आलें आहे.

राजाः—मग भेट झाली ! पुढं ?

जयं०ः—पुढं काय तेंच विचारायचं.

राजाः—पुढं ? पुढं–पुढं–

जयं०ः—असं पुढं पुढं काय करतां ? राजीव, आपल्याला सरकारी पाहुणचार सुरू झाल्यापासून सारं द्वारमंडळ हवालदिल झालं आहे. चळवळीतला राम गेल्यामुळं त्या ढिल्या पडल्या आहेत. आणि पुढारी किंकर्तव्यमूढ होऊन सर्वांच्या तोंडचं पाणी पळालं आहे. पुढं आम्हीं काय करावं म्हणजे आपल्याला संतोष वाटेल ?

राजाः—आपलं द्वारमंडळ स्वर्गीचं देवमंडळ बनल्यावांचून माझ्या मनाला संतोष वाटायचा नाहीं. पण जयंतीदेवी, मला एकट्याला तसं वाटून काय उपयोग ?

जयं०ः—कां बरं ? आपल्याला पुढाऱ्यांचं पाठबळ नाहीं का ? आपली प्रत्येक इच्छा तृप्त करायला ते तयार नाहींत का ?

राजाः—मग त्यांना पुढचा मार्ग सुचूं नये कां ? पण पुढाऱ्यांवर सत्ता चालवणारी देवताच जर द्विधाचित्त झाली, तीच जर दानवांना देव्हाऱ्यांत बसवून त्यांची देवपूजा करूं लागली, देह देशाकरतां पण आत्मा दावेदाराच्या हृदयांत अशीच जर तिची स्थिति झाली तर चळवळीच्या चिरफळ्या उडाल्यावांचून कशा राहतील ?

जयं०ः—हें आपण कुणाला उद्देशून बोलतां ? मला नाहीं बाई कळत !

राजाः—नाहींच कळायचं. इतका लपंडाव जर खेळतां आला नाहीं तर,—

जयं०ः—तर काय ? माझ्यावर का आपला रोंख आहे ? माझ्या हातून असं घडलं तरी काय ?

राजाः—घडलं तरी काय ?–पण नकोच. जियंती–नव्हे जयंतीदेवी ! आपलं मन हल्लीं कुठं असतं ? तें द्वारमंडळाच्या राष्ट्रकार्यांत वावरत असतं, कां–पण मी कशाला बोलूं ? मला सगळं कांहीं कळलं आहे.

जयं०ः—काय कळलं आहे आपल्याला ? माझं मन कुठं असतं ? जिथं असायचं तिथंच तें असतं बरं !

राजाः—नाहीं, जिथं असायचं तिथं नसतं–भलत्याच ठिकाणीं असतं ! जयंती, मला वाटत होतं पण–मला ठाऊक आहे कुणावर आहे तें !

जयं०ः—ठाऊक आहे तर सांगाना ? उगीच त्याचा इतका बाऊ करून कशाला दाखवितां ? सांगतां कुणावर आहे तें ! मारतां पैज ? जिंका बरं, खरंच जिंका !



**राजीव—**जें साधायचं तें साधलं. ( पान ५९ )

मनोरंजन प्रेस, मुंबई ४.

राजाः—ने थट्टेवारीनें. पण लक्षांत ठेव, की हा राजीव पुराव्यावांचून बोलत नाहीं. बोल, तुझं प्रेम राजेसाहेबांवर आहे की नाही ?

जयं०:—राजेसाहेबांवर ? माझं प्रेम ?-मला बाई हसूंच येतं ( हसते ).

राजाः—हसूं नकोस. हसूं नकोस. हंसून हंसून, हंसरी मुद्रा धारण करून गुन्हा छपवायाचं राजाचं कसब तूं इतक्यांत शिकशीलसं वाटलं नव्हतं मला. राजेसाहिबांना हृदयाच्या देव्हाऱ्यांत दडवून—

जयं०:—हं, हें काय ! हें बोलणं मला नाहीं बरं खपायचं ! मी निक्षून सांगतें, राजेसाहेबावर माझं मुळींच प्रेम नाही. खोटं बोलत असेन तर रौरव नरकात पडेन.

राजाः—हे शब्द बरं नुसते शब्द ! कृति मात्र अगदीं निराळी ! राजावर प्रेम असल्यांवांचून का त्याचा जीव वांचवायला धावून गेलीस ? त्याला हृदय वाहिलेलं आसल्यावांचून का मारेकऱ्याचा घाव आपल्या हृदयावर झेललास ? त्याच्या सहवासाचा ध्यास लागल्यावांचून का ग्लानि आल्याचा बहाणा करून त्याच्या रंगमहालांत प्रवेश केलास ?

जयं०:—शिव, शिव, शिव ! किती भयंकर हे शब्द ! राजीव ! राजीव ! मी काय बोलूं ? काय सांगूं ? माझा हृदयेश्वर कोण ? सांगूं ? सांगूं ? पण आपल्याला खरं कसं वाटेल ? मत्सरपिशाचानं आपल्या मनाला पुरं पछाडलं आहे. जयंती ! दुर्दैवी जयंती ! राजीवाकरतां रात्रंदिवस तळमळणारी जयंती राजीवाशी बेमान होऊन राजाशीं राजविलास करील असं राजीवांना वाटावं ना ? राजीवाशी स्वरूपसाम्य असल्यामुळं राजीवांचाच खून होत आहे, असा भास होऊन मी माझ्या राजीवांकरितां मारेकऱ्याचा घाव सोसला, तो राजीवांना राजाकरतां वाटावा ना ? राजीव ! राजीव ! या जयंतीची आपण हीच का परीक्षा केली ?

( **पद २२**—राग जोगी ताल दीपचंदी. )

**न्याय न हा राजीवा जीवा । मम कांचनसम सोज्ज्वल प्रेमा । मलिन कां व्हावा । दारुण दैवा ॥ ध्रु० ॥ व्याकुळ बाला । भडकल्या ज्वाला । मृगजल प्राणविसांवा । मरण उरें देवा ॥ १ ॥**

राजाः—(स्वगत) साधायचं तें साधलं, आतां अंत पहाण्यांत अर्थ नाहीं.(उघड) अहाहा जयंती ! लाडके जयंती ! मला क्षमा कर. तुझ्या प्रेमाबद्दल मी भलभ-

लल्या कल्पना केल्या याची क्षमा कर. राजाबद्दलच्या मूळच्या रागांत तुझ्या प्रेमाचं संशयपिशाच शिरल्यामुळं प्रेमनिराशेनं हताश होऊन मीं तुला कठेर शब्दांनीं ताडण केलं याची मला क्षमा कर. म्हण-म्हण क्षमा केली म्हणून. म्हणच. तुझ्या तोंडून ते शब्द निघाल्यावांचून माझं समाधान व्हायचं नाहीं.

**जयं०:**—प्रेमाला सतरा खून माफ असतात. राजीवांनीं जयंतीपाशीं क्षमेची का याचना करायची ?-अग बाई ! हें काय ? आपलं हृदय इतकं भिजलं कशानं ? जयंतीच्या पोळलेल्या प्रेमळ हृदयाचं पाणी अश्रूंच्या रूपानं नेत्रांतून टपटपा गळल्यामुळं का जयंतीच्या करुण वाणीनं राजीवांच्या पाषाण हृदयाला पाझर फुटल्यामुळं ?

**राजा:**—लाडके, तसं नव्हे. प्रेमाच्या जादुगारणीनं हृदयाला प्रेमामृतानं न्हाऊं घातलं त्याचा हा ओलावा आहे.

( पद २३—राग रीतगौळा एकताल )

**अश्रुबिंदुच्या कळया । मुसमुसल्या त्या खुळया । हृदयिं मम लोळल्या ॥ ध्रु० ॥ दिव्य फांकें प्रेम । चंदनसें । क्षितिजदिशा दरवळल्या ॥ १ ॥**

**जयं०:**—एवढा सगळा घोटाळा त्या मेल्या राजाच्या सारख्या तोंडावळ्यानं केला ! त्याचा चेहरा हुबेहुब आपल्यासारखा नसता, तर आपलाच खून होत आहे, असं समजून मी कशाला धावलें असतें ?

**राजा०:**—एकदा झालं तें झालं. पुनः तरी अशी चूकभूल होऊं देऊं नकोस. संभाळ बरं, नाहीं तर तो राजा आहे मोठा लबाड ! सुंदर बायकाचा फार नादी आहे तो ! माझ्यावर तुझं प्रेम आहे याचा जर का त्याला सुगावा लागला तर सारख्या चेहेरेपट्टीचा फायदा घेऊन तो राजीव म्हणून तुझ्याशीं लगट करील !

**जयं०:**—ऊंः ! तो काय करतो लगट ! आपल्यावर माझं प्रेम आहे हें असेना ठाऊक त्याला ! हो आहेच माहीत त्याला. मींच सांगितलं आहे म्हणून ! हो, काय करायचं ? त्याला आपल्यासारखंच वाटलं.

**राजा:**—काय-काय वाटलं ?

**जयं०:**—कीं मी त्याच्या राजेपणावर भाळलें ! तेव्हां सांगून टाकलं त्याला एकदां खरं !

**राजा:**—कीं राजीवावर तुझं प्रेम आहे म्हणून ?

**जयं०:**—हो, असं स्पष्टच सांगितलं. त्याचं काय भय मला ?

राजाः—भय म्हणजे असं–पण संभाळ ! नाहीं तर इंद्रानं गौतमाचं रूप घेऊन जसं अहिल्येच्या पातिव्रत्याचं हरण केलं, तसं—

जयं०:—असल्या दीर्घ शंका काढणं बरं नाहीं बरं ! आपल्या समजुतीनं जरी राजा इतका नादान असला तरी प्रत्यक्ष वर्तनांत त्याला नांव ठेवायला जागा नाहीं. माझ्याशीं तो किती सभ्यपणानं वागला ! आपण जर कधीं काळीं त्याला भेटलां—

राजाः—बस बस, मला त्याचं तोंड पाहाण्याचीही इच्छा नाही. राजाचे गोडवे माझ्या पुढं तूं गात जाऊं नकोस. तुला तो फार मोठा वाटत असेल–

जयं०:—कां पुनः मूळ वळणावर येतां की काय ? बघा मी रुसेन ! मग आपल्याशीं कधीं कधीं बोलायची नाहीं !

राजाः—छेः छेः तसं नाही. रागावूं नकोस. थोडी थट्टा केली.

जयं०:—मग पुनः नाही ना गडे कधीं संशय असा घेणार ? कधीं कधी घ्यायचा नाही बरं. म्हणा, नाही घ्यायचा म्हणून. घ्या गडे शपथ घ्या. म्हणा, कधी संशय घेणार नाही. म्हणा–कधीं–संशय–घेणार–नाही.

राजा —( जयंतीप्रमाणेंच एक एक शब्द उच्चारतो. नंतर ) हा 'म्हणा मम आत्मनः' सारखाच प्रेमाच्या प्रायश्चित्ताचा मंत्र आहे वाटतं ?

जयं०:—हो, तसंच बरं. पण हें बाई आश्चर्यच ! आपल्यासारखे देशभक्त तुरुंगांत देशाकरतां तप करून देशाचे प्रश्न सोडवीत असतील, असं मला वाटत होतं. पण इथं पहावं तर देशभक्तांचीं डोकीं प्रेमाच्या प्रश्नांनीच भ्रमिष्ट झालेली !

( पद २४—राग सिंधुरा काफी ताल दीपचंदी. )

**देवना प्रिय व्हाया । कां वीरा वरिली देशसेवा ॥ ध्रु० ॥ वेष वदे मज देश प्यारा हा । ध्यान वरी त्या प्रणया । देशपदीं कां प्रेमसमाधी । ढोंगी कावा ॥ १ ॥**

राजाः—जयंती ! तुझ्या प्रेमानं मला देशकार्याची दिशा दाखविली. तो प्रेम-दीप मालवला अशी समजूत झाल्यावर मला सर्वत्र अंधार दिसूं लागला तर नवल काय ? ( पांचाचे तास वाजतात ) जयंती, तुरुंगाच्या कायद्याप्रमाणं तुला आतां इथून गेलं पाहिजे.

जयं०:—पण मी जें बोलायला म्हणून आलें, तें तर सगळं राहूनच गेलं. राजीव ! परवांच्या दिवशी आम्हीं हस्तकलाकौशल्याची आणि खादीची जंगी मिरवणूक काढणार आहोंत. आपली संमति आहे ना ?

राजाः—माझी पूर्ण संमति आहे. मिरवणुकी काढा, हरताळ पाडा, किंवा तसाच प्रसंग आला तर सत्याग्रहही करा; पण इष्ट कार्य तडीस नेल्यावांचून राहूं नका.

जयं०:—मग हाच आपला संदेश मी लोकांना सांगतें.

राजाः—जयंती, तुझ्या तोंडून जो शब्द निघेल तो माझ्या संदेशच समज. लोकांना प्रोत्साहन देऊन चळवळीला असा जोर चढूं द्या–

जयं०:—कीं चार दिवसांतच या कैदखान्यांतून आपली सुटका झाली पाहिजे.

राजाः—या जन्मीं तरी आमच्या कपाळचा कैदखाना सुटत नाही. या कैदखान्यांतून जरी सुटलों तरी दुसरा आहेच ना ?

जयं०:—तो बाई कोणता ?

राजाः—तुझ्या हृदयाचा ! लाडके—

( पद २५ ).

देइ सदा । हृदिं सखे । बंदिवास या जिवास ॥ ध्रु० ॥ दासपदां प्रेमशृंखला । बद्ध करित प्रणय समरीं ॥१॥ बंदि शुका प्यास लागला । देइ दान अधरपान ॥ २ ॥

( एकमेकांस आलिंगन देतात. पडदा पडतो. )

---

# अंक ४ था.

---

## प्रवेश पहिला.

——:०ॐ०:——

( स्थळः०—दिवाकराच्या बंगल्याची बाग. केशरचंद व चूचौंग हंसत येतात.)

चूचौं:०—हुंः हुंः हुंः हुंः ! केंशरचंन, मोंती मंजा शालीं ना ? अंची मंजा कंदी झांली ना ! ( मोठमोठ्यानें हंसत सुटतो. )

केश०:—चूचौंग हंसते किती ? मौज तो मोटाच झाला पन् तुमी हंसते किती? जरा शबूर करा. ( चूचौंग नाचूं लागतो .) अरे नाचते काय तुमी चूचौंग पोरा शारखा ? तुमी तो म्हातारा माणस—



**राजा**—हा तुझ्या हृदयाचा कैदखाना !

मनोरंजन प्रेस, मुंबई ४.

चर्चाँ:०—चिन्नी म्हंतारा पेंता अंस्तो. चिन्नी कुंथेबी नांचतो. चांगला वांतो नांचतो. आनंद व्हंतो, नांचतो. पैंसा मिंतो, नांचतो. हां अंसा नचांतो. ( पुनः नाचतो ) केंशरचंन तुम्मी नांचा.

केश:०—आमी नै नाचते. आमचा आत्मा नाचतो है. काय नामी नामी गोष्टी जाल्या. शमदा खादी चळवळ बंद झाली. होम इंडस्ट्रीज मरून गेला ! आतां चूचँग, आपल्या मालाचा शाधर्ला ! दिवाकरानीं युक्ती काढली, एकच माणूस जैल जैना, पन आपला कषा काम झाला.

चूचाँ०:—चंग झांनला ! अंता रांगिणीला आंतो. वांटेल त्यांच्यावर खंतला कंतो. केंशरचंन, अंपुन रांजेच झांले.

केश०:—हों नै तर काय ! आपलाच राज्य है आतां. ये द्वोरमंडळ गांवांत चाहेल तें आपण करूं शकूं. महाराज माजा ऐकतो. दिवाणषावनी मला मान देतो. राजीव तो खडी फोडायला गेला ! चळवळभी षमदी बंद झाली. ( दिवाकर येतो. )

दिवा०:—चळवळ कसली बंद झाली ? दुप्पट जोरानं तिनं उचल खाल्ली आहे. उद्यां खादीची जंगी मिरवणूक निघणार आहे.

केश०:—मिरवणूक निघणार ? खादीवाल्यांची ? हा कषा झाला बुवा ?

दिवा०:—तषाच झाला ! केशरचंद, थोडा जय मिळतांच तुम्ही झोंपा घ्यायला लागलांत ! ही मिरवणुकीची वार्ता तुमच्या गांवीही नव्हती ना ?

चूचाँ०:—नाबा. मंना ताऊंकच ना. केंशरचंन ना.

दिवा०:—पण मला कळली ना ! मी केशरचंदासारखा झोंप घेत नव्हतों, किंवा हर्षवायु होऊन नाचत नव्हतों तुमच्यासारखा ! मला प्रथम बातमी कळतांच कोतवाल सय्यदअल्लीची भेट घेतली. म्हटलं अगोदर सामदामानं पाहावं. त्यांचा अभिप्राय पडला, कीं राजीवाकडूनच मिरवणूक बंद करवा. लागलीच त्यांच्या हुकुमानं कैदेंत राजीवाला भेटलों.

केश:—काय तुमी कैदेंत गेले ? अन् राजीवाला भेटले ? अन् काय बोलला ?

दिवा०:—राजीवाला मी सांगितलं, कीं लोक सारा मूर्खपणा करीत आहेत. आजकालची परिस्थिति जाणीत नाहीत. मिरवणूक काढूं नये म्हणून तूं त्यांना हुकूम पाठव. पुष्कळच सांगून पाहिलं. शेवटीं धाकदपटशा दिला. तुला राजद्रोही म्हणून फाशी देऊं-तोफेच्या तोंडी देऊं म्हणून खूप भीति घातली; पण कांहीं एक उपयोग झाला नाहीं. मलाच उलटं म्हणतों कसं, " तुम्ही कांहीं द्वारमंडळाचे राजे

नाही. महाराज कांहीं तुमच्यासारखे गाढव नाहींत, ते मला असली शिक्षा देतील ! " मीं त्याला म्हटलं, महाराज गाढवाहूनही गाढव आहेत. शुद्ध नंदी बैल आहेत. माकडासारखे आम्ही त्यांना नाचवूं.

**केश०:**—तुमी अषा बोलला ? अगदी षडकून बोलला ?

**दिवा०:**—हो बोलायला भितों कीं काय ! कुणाची भीति ! तिथं तर कुणीच नव्हतं ! तो राजीव आणि मी ! म्हटलं, ' या राजासारखा पशु दुनयेंत नाही, ' आणि त्यानं असा कांही चेहरा केला की काय विचारूं नका. मी खूप बोललों हो. पण तो कांहीं मिरवणूक बंद ठेवायचा हुकूम पाठवीना.

**केश०:**—मग आतां पुढं कशा करायचा ? तो षर कोतवाल, नो तर चळवळ्यांना शामील है. तो मदत नै करणार.

**चूचाँ०:**—दिवान संबाना भेंतू अन्नी तेच्या कंदून कोतवालावर खंटला करूं.

**केश०:**—हां दिवाणशाबाचा कान धरून हें काम करून घेऊं !

**दिवा०:**—काय करून घेऊं ? बोललांत झालं ! अहो, तो दिवाण म्हणजे काय कुकुलं बाळ आहे ? बोळ्यानं दूध पीत आहे ? असं भलतं सलतं कांही सांगायला जाल तर आपल्याच पायावर धोंडा पाडून घ्याल. कोतवालांचा बंदोबस्त करण्यापूर्वी तुमचाच बंदोबस्त तो करील. मोठा कडक म्हातारा आहे बरं तो ! मला काय कळत नव्हतं म्हणून राजीवाकडे गेलों ?

**केश०:**—मग आता दुषरा विलाज काय ? हा मिरवणूक तर बंद पाडला पेहजेना ? नैतर आपला अब्रू काय रहेल ?

**दिवा०:**—केशरचंद, या वेळीं एकच उपाय आहे, अगदीं रामबाण आहे. तो जर साधला तर या द्वारमंडळांत दिवसाढवळ्या आग लावूं.

**केश०:**—( हर्षानें ) हां हां अषा विलाज है ? षांग दिवाकर षांग लौकर. हवा तितका पैषा खरचते. लाखदोडलाख गेला तरी हरकत नै. पण अषा विलाज षांग कीं यंव !

**दिवा०:**—दुसरा कांही नाहीं. मिरवणूकीवर पठाण सोडून मिरवणूक उधळून टाकायची !

**केश०:**—हां, तो काम माझा ! एकसों पठाण जमा करतो.

**चूचाँ०:**—मी नी पन पंथान आते. रंगिनीच्या इंथें पंथान हा. पन्नास पंथान मी आंते !

**दिवा०:**—असं ? मग हा बार बिनचुक उडाला म्हणून समजा. बघा, उद्यां उजाडायच्या आंत हें काम उरकलं पाहिजे. ध्यानांत ठेवा, पठाणांचा एकदम घोळका करूं नका. पठाण गांवांत आणले आहेत हें कुणाला कळूंही देऊं नका. सगळ्या शहरांत चौकाचौकांतून दहा दहा पांच पांच पठाण लाठ्या घेऊन तयार असूं द्या. मिरवणूक आली कीं मग होऊं द्या गर्दी ! चला उद्योगाला लागा प्रथम.

**केश०:**—मग आमी जाते. चाला चूचौंग. ( जाऊं लागतात. )

**दिवा०:**—हें पहा, केशरचंद, त्या ह्याची थोडी मूठ दाबली पाहिजे. (कानांत ) महाराजांची ! एक लाखच रुपये, म्हणजे अगदीं स्वस्थ बसतं आहे तें माकड.

**केश०:**—पेढीवर जाते अन् चेक लावून देते, मग तर झाला ? तुमी अगदी निर्धास्त रहा. ( केशरचंद व चूचौंम जातात. )

**दिवा०:**—( स्वगत. ) चला लाख रुपये तर मिळणार ! त्या महाराजांच्या नांवावर या मारवाडी लंबकर्णाकडून मला लाख पाऊण लाख केव्हांही असे हाबकतां येतात ! सुखी असो बिचारा ! फारच चांगला राजा हो ! ( हंसतो. ) आतां उद्यांच्या एवढ्या मिरवणुकींत हा पठाणांचा बाँबगोळा टाकला, कीं होम इंडस्ट्रीज-वाल्यांचं पुरं उच्चाटण झालंच म्हणून समजा. दैव तर या वेळीं मला अनुकूल आहेच. पण आमच्या अकलेनं त्याच्याहीपुढं दौड चालविली आहे ! आतां बोलबोल करतां विदेशी मालाचा बाजार तेजीला येणार आणि नवीन गिरण्यांचे शेअर्स खपून माझ्या नांवाच्या ' दिवाकर मिल्स ' या द्वारमंडळांत सुरू होणार ! अहाहा ! दिवाकरमिल्स! माझ्या नांवाच्या दिवाकरमिल्स ! स्वर्ग मला आतां फक्त एकच बोट उरला आहे !

( जातो. )

( स्थळ—दिवाणखाना—खुर्च्या, राउंडटेबल, कपाट, कोच वगैरे सामान. एका बाजूस एक मच्छरदाणीनें झांकलेला छपरी पलंग. रागिणी येते. )

**रागि०:**—( स्वगत ) उद्यांची ही मिरवणूक आली आमच्या खेळाच्या राशी-वर ! खरोखरच, या धंद्याच्या काळजीनं हल्लीं झोंप येईनाशीं झाली आहे. आतां दोन प्रहरची तरी येईल का जरा ? पाहूं शेजेची जरा आराधना करून ! ( मच्छर-दाणी उघडते व दचकून मागें सरते. ) अगबाई ! पलंगावर निजलं आहे कोण ? मुक्ता तर नसेल ? पण ती मोलकरीण ! ती अशी माझ्या पलंगावर कशी झोंपेल ? ( पुनः मच्छरदाणी वर करून पहाते. ) अगदीं डोक्यावरून पांघरूण घेतलं आहे. ही

लांब वेणी बाहेर आहे. मुक्ताच असेल. ( हालवून ) ए मुक्ते! मुक्ते! अग ऊठ की ग!–( पांघरूण काढते. चूचाँग उठून बसतो व बाहेर येतो.) अगबाई!–हा?

चूचाँ०:—मी चूचोग! मिस्तर चूचोंग!

रागि०:—कोण तरी बाई हा फाजीलपणा! चूचाँग! तुम्ही कसे आलांत इथं माझ्या खोलीत? माझ्या पलंगावर कां निजलांत? बोला––

चूचाँ०:—मीन्ना, असाच अंलो. रांगिनी, तू मांजी. मांज प्रेम तुज्यावर हा—म्हन आंलो अन्नी असा निदलो!

रागि०:––मग आतां आलांत तसे जा एकदम इथून. नाहीं तर दारावरच्या पठाणाला बोलावून गचांडीच देववीन.

चूचाँ०:—मीन्ना जांचा पंथान वळंकटतो. तो मांजा नोकर हा तोंच इंथ मन्ना अंतो.

रागि०:––अगबाई! त्या मेल्या पठाणांनीच आणलं काय? अरे हरामखोरा! मग आतां तुम्ही बऱ्या बोलानं जाता का नाहीं?

चूचाँ०:—ना जांतो. ता बंघ झुरळ! ( उडी मारून झुरळ पकडतो. ) रांगिनी हा झुरळ तूं खा, गोंद लांगतो खां खाच.

रागी०:—इश्श गि बाई! काय खा झुरळ? ईSSSSS!

चूचाँ०:–––चांगा लांगतो. अम्मी चिन्नी खांतो. अंसा खांतो. ( झुरळ खातो व तोंड वेडें वाकडां करून ) गोंद लांगतो. ( भिटक्या मारतो. ) आम्मी उंदीर खांतो. बेंदुक खांतो. तूं मांजा हो मी तुळा बेंदुक देंतो. तूं मांगशील तें देंतो. तुना चिन्नीबाईचा ड्रेस देंतो. चिन्नीड्रेस नामी दिस्तो. तूं चिन्नी ड्रेस कर. मीनी तुला पांचशें रुपी देंतो.

रागि०:—मंला कांही नको. तुम्ही जा इथून. नाहीं तर मीच जातें—

( जाऊं लागते. )

चूचाँ०:—( तिला अडवून ) ना—नंको जा–मी ना जाऊं द्यायंचा–एंक मुंका घेंतो. ( रागिणीला धरतो. )

रागि०:—( हिसडा मारून ) अरे कुणीतरी धांवारे, लौकर या.

चूचाँ०:- कुन्नी ना अंते. मुंका दे. ( पुनः धरतो. )

रागि०:—( ओरडून. ) अरे धांवा कुणीतरी. धांवारे धांवा. चंदन! श्याम!

( जयंती व चंदन येतात. चूचाँग दूर सरतो. )



रागिणी—मला कांहीं नको. तुम्ही जा इथून. (पान ६६

मनोरंजन प्रेस, मुंबई.

जयं०:—हे कोण चूचाँग !

रागि०:—अगबाई ! जयंतीदेवी ! मी आपली फार आभारी आहे आपण आलांत म्हणून या चिनी चांडाळाच्या हातून माझी मुटका झाली.

जयं०:—तुमचं ओरडणं ऐकून मी या मॅनेजराला म्हटलं, रागिणीबाई कां ओरडत आहेत ? पण हे म्हणाले, त्या आपल्या कामाची तालीम करीत असतील ! ही तालीम का ?

रागि०:—नाही, मी कधी कधीं काम बमवीत असलें का अशी ओरडतें. पण खरं आणि खोटं यांतला भेद, चंदन तुम्हांला कळूं नये अं ? बघत काय राहिलांत असे ? या चिनई माकडाला प्रथम खेचून बाहेर काढा. आणि बेदम मार देऊन पोलिसच्या स्वाधीन करा–हें पहा पुनः माझ्या वाटेला जाणार नाही असं करा. ( चंदन चूचॉगची मानगुटी धरून त्याम खेंचून नेता. ) जयंतीदेवी ! या बसा. आपण कुणीकडे आलांत ?

जयं०:—आपल्याकडेच. उद्यांच्या मिरवणुकीत आपण काय भाग घेणार ? आपल्याला विचारायला आलें आहे.

रागि०:—या मोठ्या लोकांच्या मिरवणुकीत आम्ही कसला भाग घेणार ? आम्ही बोलून चालून नाटकवाले ! आमच्या हातून काय होणार ?

जयं०:—असं का बरं म्हणतां ? तुमच्या नाटकवाल्यांच्या हातून कांहीच झालं नाही का आजपर्यंत ? खादीची चळवळ सुरू झाल्याबरोबर सर्वांच्या आधीं तुम्ही नाटकी लोकांचेच कपडे मीं खादीचे पाहिले ! तुम्ही खादीवर नाटकेंही केलीत ! धर्मार्थ प्रयोग करून त्यांचे हजारो रुपये उत्पन्न राष्ट्रीय फंडांना दिलेत. तुम्हांला शक्य तें सारं तुम्ही अद्यापही करतांच आहां. म्हणूनच विचारतें, उद्यां आपण काय भाग घेणार ?

रागि०:—आपण हुकूम कराल तो भाग आम्ही उचलूं. पण उद्यां रात्रीं आमचा खेळ आहे, हें ध्यानांत ठेवून कामगिरी सोपवा म्हणजे झालं.

जयं०:—तुमच्या खेळाच्या आड आम्ही मुळीच येत नाहीं. पण उलट उद्यांच्या नाटकाला गर्दी उसळेल अशीच मदत आम्ही करूं. मग तर हरकत नाहीं ना ? रागिणीबाई, आपल्या कंपनीतील सर्व मंडळीसह आपण मिरवणुकींत सामील झालं पाहिजे.

रागि०:— मंडळी सर्व येईलच. पण माझी थोडी अडचण आहे. जयंतीदेवी, मी जातीची वेश्या आहें. मी जरी देहविक्रयाचा धंदा न करितां प्रामाणिकपणानें रंगभूमीची सेवा करून चरितार्थ चालवितें तरी मी एक हलकी वेश्या आहें हें मी कशी विसरेन? मी जर मिरवणुकींत असलें तर लोकांना तें आवडणार नाहीं—लोक आपली व माझी हेटाळणी मात्र करतील!

जयं०:—लोक हेटाळणी करतील कदाचित; नाही कुणी म्हणावं? पण लोकांनीं तरी हें जाणून असलं पाहिजे, कीं वेश्यागमनी व्यभिचारी पुरुषांना आणि दुराचरणी स्त्रियांना असल्या समारंभांतून मिरवायची मुभा असावी आणि आपल्या सारख्या जातीनं वेश्या पण गुणांनी उच्च अशा बायकांना नसावी!

( पद. २६--गझल )

दीन वदता जबता ! पायिं दडपिता पतितां ॥ रूढि जुलुमा उपमा ।
नाहि जगतिं त्या अधमा ॥ ध्रु ॥ पुरुष देति वृथा लाथा,कां वनितांना ।
पुनित आर्य कसा दूर करी अस्पृश्यां ॥ १ ॥ हरिति वर्णगुरु अन्यजाति
स्वातंत्र्या । जगतिं कान पिळी तोचि बळी त्या सत्ता ॥ २ ॥

रागि०:—आमच्या पूर्वजांचीं पापं आमच्या सर्व जातीला भोगावीं लागत आहेत—आम्ही पतित रात्रंदिवस पापपंकांत लोळत आहोंत. त्यांतून जयंतीदेवी, समाज आम्हांला केव्हां वर काढणार?

( पद २५--राग तिलंग ताल त्रिवट )

कुलिनमति वारवनिता । दुहिता त्यजित कुपथ गति । निवडित नाथा ।
देव गणुनि त्या । उजळ करि माथा ॥ ध्रु० ॥ सधन नीच कामातुर
ज्या । भय न लाज कशि । पतित सदा त्या ॥ १ ॥

जयं०:—राजीवांची मुक्तता होऊं द्या. आपणच या कार्याला हात घालूं. रागिणी आई, राजीवाबद्दल आपल्याला काय वाटतं?

रागि०:—मला त्यांच्याबद्दल बंधुप्रेम आणि आदर वाटतो. त्यांचे माझ्यावर फार उपकार आहेत-मी त्यांच्या करतां वाटेल तें करीन.

जयं०:—होय ना? मग राजीवांचा आपल्याला एक निरोप आहे.

रागि०:—बोला बोला त्यांचा काय हुकूम आहे?



जयंती—रागिणीबाई, राजीवाबद्दल आपल्याला काय वाटतं ? ( पान ६८ )

मनोरंजन प्रेस मुंबई

जयं०:—ते म्हणाले कीं, रागिणीबाईचं गाणं स्फूर्ति उत्पन्न करणारं आहे. तर उद्यांच्या मिरवणुकीबरोबर त्यांना घेऊन हीं गाणीं त्यांच्या तोंडून म्हणवावीं ( गाण्याचे कागद देते. ) हीं स्वतः राजीवांनींच रचून पाठविलीं आहेत.

रागि०:—( कागद पहात ) राजीव हा मला मोठाच मान देत आहेत—अगबाई ! या माझ्याच चाली. या चालीवर पदें करायची राहून गेलीं. त्याच चालीवर त्यांनीं हीं गाणीं रचलीं आहेत.

जयं०—होय का ? मग आपण तीं एकदा नीट पाहून ठेवा, आणि उदईक सर्व मंडळीसह मिरवणुकीला या. मी येतें आतां.

रागि०:—चला मीही आपल्याला चार पावलें पोचवून आपली पधरामणी करतें.

( जयंती व रागिणी जातात. )

## प्रवेश ३ रा.

[ स्थळः—बाबासाहेबांच्या घरांतील एक दालन. विश्राम एक लेदरबॅग व कपडे घेऊन येतो व भरीत बसतो. ]

विश्रा०:—( स्वगत ) शेवटीं निघायची धांदलच ! जॉली फादर्स कंपनीचा मॅनेजर होतों, चार माणसं हाताशीं होतीं ! प्रवासाला निघायचं तर कांहीं पहावं लागत नव्हतं. पण आम्ही त्या मॅनेजरीचा राजिनामा दिल्याबरोबर आमच्या उसन्या वैभवानंही आमच्याकडे राजिनामा गुजरला ! हं विश्राम ! आतां भरा बॅग आपली आपणच ! आज घरांतली चटसारी मंडळी खादीच्या मिरवणुकीला गेली आहेत ! खुळं आहेत झालीं एकेक ! खादी म्हणजे प्लेगसारखा एक स्पर्शजन्य रोग आहे. चांगली चांगलीं सुशिक्षित माणसंही या रोगाला बळी पडतात ! माझी नंदिनी—पण आतां कसली माझी ?—नको तिची आठवणच नको. (बॅग भरूं लागतो. नंदिनी येते. )

नंदि०:—कुठं जायची तयारी चालली आहे ?

विश्रा०:—कोण ? हंः ( दुर्लक्ष करून पुनः बॅग भरूं लागतो. )

नंदि०:—नाही म्हटलं, कुठल्या सफरीची तयारी चालली आहे ?—उत्तर द्यायला फुरसत नाही का ?-मी भरते बॅग. आपण जरा बोला माझ्याजवळ! ( बॅग उचलून एकीकडे नेऊन ठेवते. )

विश्रा०:—काय विचारतां आपण ? मी कुठं जातो आहे ?–ससणवटीत ! आपल्याला काय मी कुठं गेलो तरी ! परवांपासून तूं माझ्याशी शब्द तरी बोललीस ? काल मी तुला पत्र लिहिलं ! माझा कसा कोंडमारा झाला तें सविस्तर तुला कळवलं ! पण तुझा आपला अबोला ! आमची तुम्हांला पर्वाच नाही. मग म्हटलं करायचं काय इथं राहून ? जावं मुंजापूरला आणि व्हावं हिंददासमंडळांत सामील-

नंदि०:—एकूण आपण मवाळ होणार ? मवाळांच्या कळपांत शिरणार ? मोठं नांव मिळेल नाही त्यांत ?

विश्रा०:—मिळो न मिळो आतां कांही लग्नवऱ्हाडाची आशा नाही. येऊन जाऊन सन्यास घ्यायचा. मग हा तरी काय ? एक सन्यासच ?

नंदि०:—होः ! घेतला बरं संन्यास—खरोखर घेतला ! नुसता नांवाचा नव्हे अगदी खराच. ही—ही काय अंगांत परदेशी नेकटाय कॉलर शर्ट आहेत ? छे. छेः अगदी संन्याशाची स्वदेशी भगवी कफनी ! खूप लहर आली आहे बाई संन्यासाची !

विश्रा०:—ही लहर नव्हे बरं. पुरा विचार करून निश्चय केला आहे. थट्टा वाटते तुला ? थट्टा नव्हे बरं. मी खरोखरच हिंददासमंडळ जॉईन करणार ! अगदी कृत संकल्प !

नंदि०:—मवाळ बनायला इतकं कांही जहाल व्हावं लागत नाही ! काय मवाळसाहेब ?

विश्रा०:—कर हवी तेवढी थट्टा कर. मवाळ म्हण—गबाळ म्हण किंवा गचाळ म्हण. मला आतां त्याची पर्वाच नाही.

नंदि०:—पर्वा नाही ? आपल्याला माझी सुद्धां पर्वा नाहीं ?

विश्रा०:—हो हो नाही. तुला आतां माझ्याशी लग्न थोडंच करायचं आहे ?

नंदि०:—विश्राम ! थट्टा राहिली. जरा माझं ऐका.

विश्रा०:—मला आतां कुणाचंही ऐकायची जरूरी नाही.

नंदि०:—नसूं द्या, पण जरा ऐकाच. विश्राम ! परवां राजद्रोही म्हणून राजीवांना शिक्षा दिलीत. मी स्वतः त्यांच्या बाजूनं साक्ष द्यायला आले, तरी तुम्ही शिक्षा दिलीत. मला मेल्याहूनही मेल्यासारखं झालं. खरंच सांगतें, मला त्यावेळी

तुमचा संताप आला. तुमचं पुनः तोंड पाहूं नये असं वाटलं. माझ्या प्रेमाची आपल्याला त्या विदेशी व्यापाऱ्यांपुढं किंमत वाटली नाही ! आमच्या मायेचा फांस मसणवटीत आणि त्या विदेशी व्यापाऱ्यांच्या मर्जीची माळ आपल्या गळ्यांत !

**विश्रा०:**—कसली मर्जी ? काल मी तुझ्याकरता त्या नोकरीचा राजीनामासुद्धां दिला.

**नंदि०:**—दिलात कबूल. माझ्याकरता दिला असो किंवा आणखी कांहीं कारणामुळं दिला असो, पण दिलात; आणि त्या आनंदाच्या भरांत आपल्याला धन्यवाद देण्याकरतांच मी आले. पण इथं काय ! ही संन्यास घ्यायची तयारी ! विश्राम ! विश्राम ! कांहींतरी लाज धरा. तुम्ही जर त्या हिंददास मंडळांत शिराल तर मी तुम्हांला मवाळच म्हणेन.

**विश्रा०:**—म्हण म्हण—बेलाशक म्हण. ज्याला खरी देशसेवा करायची असेल, देशाचा उद्धार व्हावा अशी ज्याची अंतःकरणापासून इच्छा असेल, त्यानं हिंददास मंडळांतच प्रवेश करावा. तेंच त्याचं कर्तव्य ! तेंच माझं कर्तव्य !

**नंदि०:**—आपलं खरं कर्तव्य आपल्या वडिलांच्या आपल्या भगिनीबांधवाच्या खांद्याला खांदा देणं—या खादीच्या यात्रेंत सामील होणं ! विश्राम ! खादीचं नांव निघतांच तुम्ही नाक मुरडूं नका. देशोद्धाराकरतां देह द्यायचा अशी निष्ठा बाळगून 'मी मी' म्हणत या मिरवणुकींत सगळ्यांचा अघाडीला जाऊन तुम्ही उभे रहा. आपल्या गळ्यांत लग्नाची मंगलमाला मी घालायला तिथं तयार आहे. तुम्ही हस्तकला प्रसारक व्हा. या खादीच्या मेळ्यांत तिथं तुमची जागा आहे.

**विश्रा०:**—नाही नाही. या माथेफिरूंच्या थव्यांत शिरायला माझं माथं फिरलं नाही माझी जागा खऱ्या देशभक्तांत आहे, आणि खरे देशभक्त म्हणजे—

**नंदि०:**—मवाळ ! आज काल ज्यांना कुणी भीक घालीत नाही ते मवाळ !

**विश्रा०:**—तुझी ही आतां मतं झाली. मला तुझ्या सारखी क्षणोक्षणीं मतं बदलता येत नाहीत. खादीचा प्रसार म्हणजे शुद्ध मूर्खपणाचा बाजार ! त्या मूर्खांच्या बरोबर मी मूर्ख होऊं ? म्हणे खादी वापरा ! कशाकरतां ? तर मायभूमीच्या मुक्ततेकरतां ! नंदिनी ! खादीचं खरखरीत तरट अंगांत घालायला मी कांही कंगाल कुणबट नाही ! मी रानटी नाही. चांगला सुशिक्षित आहे.

**नंदि०:**—सुशिक्षितांना तर मायभूमीबद्दल जास्तच प्रेम वाटायला हवं.

**विश्रा०:**—हवंच ! नाहीं कोण म्हणतो ? पण मायभूमीच्या प्रेमाचं प्रदर्शन म्हणजे असल्या खुळ्या चाळ्यांचा खेळ नव्हे. शहाण्यासुर्त्यांनीं असल्या जंगली लोकांच्या नादी लागावं काय ?

**नंदि०:**—आपल्याला सारे लोक भागुबाई म्हणतील !

**विश्रा०:**—म्हणूं दे. आज म्हणतील पण लवकरच असा दिवस येईल, की आम्हांला देव मानून लोक आमचीच देव्हाऱ्यांत पूजा करतील.

**नंदि०:**—पण हल्लीं लोक आपली कशी पूजा करीत आहेत पहा ! आपल्याला 'शेम शेम' चीं फुलं वाहाताहेत ! फाटक्या पायपोसांचे चर्महार आपल्या गळ्यांत पडताहेत ! छीःथूच्या अक्षता आपल्या मस्तकावर शिंतडताहेत !

**विश्रा०:**—राजीवासारखे सवंग लोकप्रियतेला लालचावलेले लोक आमच्यावर असले शितोंडे उडवणारच ! काय बेटा मुर्दाड ! मी दोन वर्षांची शिक्षा सांगतांच म्हणतो कसं, ' इतकीच ? दोन वर्षांचीच ? मला वाटलं जन्मठेप काळ्यापाण्याची असेल आणि हंसला खदखदा !

**नंदि०:**—ते हंसणं देशभक्तांच्याच भाग्याला येतं ! त्याची किमत–त्यांतली गेंडी गुलामांना नाहीं कळायची ! तुरुंगांच्या दारांतच काय; पण खरा देशभक्त मृत्यूच्या जबड्यांतहीं खदखदा हंसेलच. ( ' मारो ठोको हरानखोरकू ' अशा आरोळ्या ) एका–खादीची मिरवणूक उधळून लावण्याकरता तुमचे मारेकरी पठाण आले ! विश्राम ! आज द्वारमंडळ–तुमची मातृभूमी–तुमची आई परदेशी पठाणांच्या लाठ्यांनीं रक्त बंबाळ होणार हें पाहून तुमचं अंतः करण भडभडून येत नाहीं का ? तुमच्या काळजाला घरे पडत नाहीत का ? तुमचं आतडं तुटत नाहीं का ?

**विश्रा०:**—तुटत नाहीं कसं, तुटतंच ! पण लोकांना तरी एवढा हट्ट कशाला हवा ? ही खादीच्या बाजाराची खाजवून खरूज काढायची कांहीं तरी जरूर ? मिरवणूक काढून मुलूख जिंकायला–दुनयेचा दिग्विजय करयला निघाले आहेत जसे !

**नंदि०:**—त्यांना नवा मुलूख जिंकायचा नाही. त्यांचा मुलूख–त्यांचे हातमाग–त्यांचे उद्योगधंदे त्यांना राखावयाचे आहेत. विश्राम ! विश्राम ! हा डोळ्यावरचा सारा दूर सारा, आणि नीट पहा. तुमच्या शेतकऱ्यांचीं घरं दारं खाक झालीं, तुमच्या उद्योगधंद्यावरून नांगर फिरला, तुमचा मान अब्रू दर्जा लयाला चालली. तुम्हांला कांहींच वाटत नाही ? तुम्ही इतके मवाळ झाला ? छेः छेः मी तुम्हांला इतके मवाळ बनूं द्यायची नाहीं. विश्राम ! मी किती अभिमानी आहे तुम्हांला माहीत आहे. पण यावेळीं मी आपला अभिमान बाजूला ठेवते. परवांच्या गोष्टी




चित्रांच्या मागच्या पृष्ठावर अशा तऱ्हेच्या जाहिराती घेतल्या जातील.

मनोरंजन प्रेस, मुंबई.

विसरून जाते, एकच मागणं मागते. एकच एकच हौस पुरवा—एकच विनवणी ऐका ! खादीप्रसाराला चला. ( वंदेमातरमचा जयघोष आंत होतो. ) ऐका ! तुमची भावंडं तुम्हांला हांका मारीत आहेत—चला चला हा खादीचा सद्रा आणि ही टोपी घाला, आणि त्याच्या शेजारी जाऊन उभे रहा. ( पुनः ' वंदे मातरम. ' ) ऐका, ही पुनः हांक ऐका ! विश्राम ! ' मातृभूमीच देणं द्यायला या ' म्हणून हें तुम्हांला वॉरंट आलं आहे. पहा पहा ! तुमच्या मनाची खळबळ उडाली आहे. पण तुमच्या बुद्धीला पटत नाहीं. विश्राम ! बुद्धि ही बाजार बसवी आहे. स्वयंस्फूर्तीच्या गृहिणीपदाकरतां धडपड करणारी एक छिनाल बंडखोर आहे. तिला तिलांजलीच द्या, आणि स्फूर्ति देवतेचा हुकूम शिरावर घ्या.

**विश्रा०:**—स्फूर्ति म्हणजे लहर. ती चुकण्याचाच संभव फार.

**नंदि०:**— नाहीं, स्फूर्ति कधींच चुकायची नाहीं. तिची बेधडक आज्ञा पाळा बघा–तुम्हींच बघा–तुमचे पाय तिकडे ओढ घेऊं लागले ! ( ' धरा मारा त्या अवदसेला ' असा आंत ओरडा. ) विश्राम ! ऐका ! ही अवदसा कोण ? जयंती बरं ! जयंती ताईला–तुमच्या पाठच्या बहिणीला मारेकरी मारीत असतांना तुम्हांला इथं रहावतं कसं ? ( आंत जयंती ' मारा ठार मारा. एक केसभरसुद्धां मी मागें जाणार नाहीं. ' असें म्हणते व लोक ' जयंती देवी की जय ' ' राजीव महाराज की जय ' असें ओरडतात. ) ऐका–हा जयंती देवींचा–कैदी राजीवांचा जयजयकार ऐका. चला तुम्हीही चला, तुमच्याही नांवाचा लोक असाच जयजयकार करतील ! ( आंत वंदे मातरम् ) चला, हा खादीचा पोषाख घाला आणि मातृभूमीच्या वंदनाला चला. तुमच्या रक्ताचं तिला स्नान घाला. तुमचं शिरकमल वाहून तिची पूजा बांधा.

**विश्रा०:**—( एदकम अंगांतील शर्ट फाडून ) आण आण तो खादीचा सदरा ! दे ती खादीची टोपी ! खादी परिधानानं पवित्र होऊन मला खादीप्रसाराला जाऊं दे. वंदे मातरम् ! अहाहा ! आई, मी तुला वंदन करतों. चल नंदिनी चल.

**नंदि०:**—थांबा जरा विचार करा.

**विश्रा०:**—कसला विचार ? मातृभूमीच्या मायेनं देहभान नाहींसं झाल्यावर कसला विचार ?

नंदि०:—उद्यां तुमचे विदेशी व्यापारी–तुमचे मवाळ बंधू तुम्हांला दोष देतील. नंदीबैल म्हणतील !

विश्रा०:—उद्यांची कोण पर्वा करतो ? आज काय होत आहे तें पाहूं. मातृभूमीच्या मरणाला कारण होण्यापेक्षां, नांगरून तिची सेवा करणारा-बैल बनलों तर काय वाईट ? त्यांतून तूं नंदिनी, तेव्हां मी नंदीच ! या नंदी बैलाच्या अंगावरच्या तलम विदेशी पोशाखाचा लाजाहोम पेटवून सप्तपर्दाच विधि पुरा करूं आणि खादीच्या मिरवणूकीबरोबर आपल्याही लग्नाची वरात काढूं ! ( मालिनी येते )

मालि०:—हे कोण ? बाबा, तूं ? आतां तूं माझा बाबा शोभतोस खरा. ( त्याला घट्ट आवळते. ) आतां बघ मी तुझा असा पापा घेईन. पण नंदिनीताई,–नव्हे नव्हे आई ! बाबांनी हे नवे कपडे घातले आहेत; नऊ बुक्के नकोत द्यायला का ? बाबा ! चल घे पाठीत. कर पाठ इकडे. ( मोजून नऊ बुक्के मारते. ) हे फक्त सदऱ्याचे झाले ! आतां टोपीचे दुसरे नऊ घे.

पद २८––( गझल )

**लाडुकलीचा हा नजराणा । साजत सुबकहि । नव नवरीला ॥ ध्रु० ॥ खीचत पत्निपती तीं वसनें उभयांना । वसन नाथ असा सुंदरसा तुज कां ना ॥ १ ॥ गमत भातुकली गोड जशी छकुल्यांना । रमुनि संसारीं मालिनिला विसरा नां ॥ २ ॥**

( पुनः पुनः बुक्के मारते. )

नंदि०:—माले ! तूं खादीवाली ना ! मग बुक्के कसे मारतेस !

मालि०:—हे अस्से. ( नंदिनीला मारूं लागते. ) नाहीं नाहीं आतां परत नाही मारणार !

विश्रा०:—मी खादी वापरीपर्यंत सगळ्याच माणसांनी माझ्याशीं सत्याग्रह केला. एकूण सत्याग्रह हा घटस्फोटाचा विधि नसून दृढप्रेमाचं दर्शकच आहे.

नंदि०:—तसंच बरं ! चला आतां मिरवणुकीला. ( जातात. )

# प्रवेश ४ था.

( स्थळ—कापडबाजारांतील एक चौक. खादीच्या पोशाखांत बाबासाहेब वगैरे पुरुष व रागिणी वगैरे स्त्रिया, तऱ्हेतऱ्हेची खादी व देशी वस्तु घेऊन उभे. समोरच दिवाकर, केशरचंद, चूचँग व लाठ्या घेतलेले पठाण. बाबासाहेब व स्वयंसेवक 'वंदे मातरम्' म्हणून पुढे जाऊं लागतात )

**केश०, दिवा०, चूचँ०**—मारो हरामखोरको पठाण क्या देखते हो, उडाव लाठी! ( पठाण बाबासाहेबांना मारूं लागतात. )

**बाबा०:**—मारा कितीही मारा, प्राण गेला तरी आम्ही उलट हात उचलणार नाही स्वयंसेवक हो, चला शांतपणानं पुढं चला वंदे मातरम्! ( लोक वंदे मातरम् म्हणून ओरडतात )

**दिवा०.**—कां मरतां उगीच पुढं जाऊन! फिरा मागं. अरे हे तुमचे पुढारी बहकले आहेत. करा त्या खादीची होळी आणि जा आपआपल्या घरी. काय तुम्ही ऐकत नाही?—मग मरा, पठाण! ठोको. टाळकी फोडून टाका हरामखोरांची ( विश्राम व नंदिनी येतात. )

**विश्रा०.**—( पुढं होऊन ) फोडा, प्रथम आमची टाळकी फोडा. मग इतरांची.

**दिवा०:**—कोण, विश्राम? हें काय? तुम्हांला ही खादीची टोपी कुणीं घातली?

**विश्रा०:**—तुम्हीच. तुम्ही आमच्यासारख्यांना टोप्या घालतां, खादीचे व्रत घ्यायला लावतां, आणि नोकरीचे राजीनामे द्यायलाही भाग पाडतां. तुमच्या नीचपणाचं हें प्रदर्शन पहा

**दिवा०:**—एकूण तुम्ही राजद्रोही बनलां कुछ् फिकीर नाही! तुम्हाला पाहून घेतों.

**नंदि०:**—पाहून घेतों म्हणून धमकी कुणाला देतां? घ्या पाहून! या मारेकरी पठाणांकडून मारवणार इतकंच किनई? मारा, आमची तयारी आहे.

**दिवा०:**—या पोरीनं विश्राम, तुम्हांला वेड लावलं वाटतं? काय चमत्कार आहे! अलीकडे बायकाच पुरुषांना देशभक्तीचे धडे देऊं लागल्या आहेत!

**नंदि०:**—यांत चमत्कार तो काय! स्त्रिया म्हणजे माता! त्यांचा तो धर्मच आहे. त्या ज्या कामाला हात घालतील तें यशस्वी व्हायचंच.

केश०:—चलो बंडखोर ! एकदम तुमी इथून जाव. नै तर पोलिश बोलवते आणि बंदुकीचा फायर करते. ( जयंती निशाण घेऊन येते. )

जयं०:—फायर तुमच्या घरचाच असेल किनाई ! फायर करा, तोफा डागा, प्राण गेला तरी आम्ही मागं तर हटणार नाहींच; पण असं पुढंच पाऊल टाकणार ! बोला, राजीव महाराज की जय ! ( सर्व ओरडतात व पुढें जाऊं लागतात. )

दिवा०:— }
चुचाँ०:— } पठाण, चढवो हल्ला ! लगावो लाठी ! ठार मारो एकजात सब हरामजादे लोगोंको. (पठाण लाठ्या उगारून जयंतीवर धांवतात.)
केश०:— }

जयं०:—मारा ठार मारा ! ही मी तुमच्यापुढं उभी आहें. प्रथम मी रक्तानं न्हाईन मग हे माझे पाठिराखे बांधवहो, अन्यायनं कैदेंत कोंडलेल्या तुमच्या राजीवांचा–तुमच्या सेनानायकांचा संदेश माझ्या मुखानं तुम्हीं ऐका ! या विदेशी व्यापाऱ्यांच्या दडपशाहीनं हादरणाऱ्या धरणीमातेची हांक माझ्या मुखानं तुम्ही ऐका ! नश्वरदेह धरणीमातेकरतां बळी पडतील पण अमर आत्मे परमेशाच्या पायाजवळ द्वारमंडळाकरतां पुनर्जन्म मागून घेतील. जिवांत जीव असेपर्यंत द्वारमंडळाच्या बाजारांतून विदेशी मालाची हकालपट्टी केल्यावांचून राहूं नका.

( पद राग भैरवी. ताल दादरा केरवा )

बांधव गा सदा । प्यारा स्वदेश मम ॥ ध्रु० ॥ जागृति स्वप्निं शयनि पहुडता । धर्मनिमनि वदा । प्यारा ॥ १ ॥ वैभविं किंवा काळाच्या मुखीं । डगमगता वदा । प्यारा ॥ २ ॥ देशासाठीं फकिरि मिरविता । हरघडी दोहरा । प्यारा ॥ ३ ॥ स्वातंत्र्याच्या शैलशिरिं चढा । पदिं पदिं गर्जना । प्यारा ॥ ४ ॥

दिवा०:— }
केश०:— } जवान ! मारो ठोको पिटो ! ऐ रंडीका खून करो. उपसा सुरे आणि करा ठार या कैदासणीला.
चूचाँ०:— }

( पठाण सुरे उपसून जयंतीला ठार मारणार तोंच मोटारमधून राजा, दयाळ, सय्यदअल्ली व दिवाण येतात.)

राजाः—सबूर ! एकदम सबूर ! स्त्रीवर सुरे ? ज्या जयंतीदेवीनं आपल्या जिवाची ढाल करून मला पुनर्जन्म दिला, त्या जयंतीदेवीवर हल्ला ! सय्यद, पकडा ऱ्या पठाणांना. ( पोलीस पठाणांना बेड्या ठोकतात. )